धुऊन नेला होता. लोकांस जसें दारिद्य आलें तसा त्यांचा प्रामाणिकपणा आणि त्यांची विश्वासपात्रताही नाहींशीं होत चालली; आणि त्या दोन अवश्य गुणांच्या अभावामुळें, कर्जाच्या रकमेवर व्याजाचे दरही अतिशय वाढत जाऊन, ते लोकांच्या प्राप्तीचा सत्यानाश करण्यास अधिकाधिक कारण झाले व ती गोष्ट साहजिकच होती. खुद्द राण्यावरील सावकार लोकांचा विश्वास कमी झाल्यामुळें आणि देशांतलें भांडवल आटत चालल्यामुळें शेंकडा ३६ टक्के व्याजाच्या दरानें राण्याला कर्जें काढावीं लागलीं ! आणि शिवाय जमिनीच्या वसुलावर त्याला शेंकडा २५ पासून ४० टक्क्यांपर्यंत वसूल करणारांस मनोती द्यावी लागे. ह्मणजे, सरकारी वसुलाचे १०० रुपये वसूल करून आणून दिले तर, त्या वसुलापैकीं वर लिहिल्याप्रमाणें २५ पासून ४० रुपयांपर्यंत इनाम त्या वसूल करून आणून देणारास राण्याला द्यावे लागत. व ह्याप्रमाणें वसुली करण्याचे राण्याकडून सर्वांस परवाने देण्यांत येत. करतो काय बिचारा ? ती वेळच तशी होती. पैसे तर पाहिजेत. असें केल्यावांचून गत्यंतरच नव्हतें. आणि वरील वसुलीची रीति, राणा इंग्रजांचे साह्यानें पुनः आपल्या अधिकारावर आला व सर्वत्र शांतिस्वास्थ्य झालें तरी त्यावर, पुढें कित्येक दिवस चालू होतीच. आतां राणा गादीवर आल्यावरही, त्याचा जो उधळेपणाचा स्वभाव तो आणि सढळ हातानें खर्च करण्याची जी त्याची रीति ती दिवसेंदिवस जोरानें वाढतच चालली. लोक वस्तीला येऊन राहिले न राहिले व त्यांणीं शेतेंभातें नांगरून त्यांच्या पेरण्या केल्या न केल्या तोंच त्याणें त्यांचेकडून जमिनीच्या साऱ्याचे पैसे आगाऊ मागण्याचा तगादा लाविला. पुढील उत्पन्नावर अनुमानानेंच हा साऱ्याचा पैसा राण्यानें मागितला. त्यासाठीं आणि शेतकरी लोकांस बियाण्याकरितां व पुढील आठ महिन्यांच्या निर्वाहाकरितां जें धान्यधुन्य, दाणागोटा वगैरे संग्रह करावा लागला त्याजबद्दल, त्यांना आपल्या सावकारांस, भावी उत्पन्नाच्या आशेवर आढीच्या दिढी व्याज भरून पैसा काढावा लागला. देशाच्या एकंदर अशा स्थितींत त्याची भरभराट व्हावी व त्याजमध्यें नीति आणि संपत्तिमत्ता वाढावी अशी इच्छा बाळगणें, व ती इच्छा पुरी करण्याचे श्रमांस लागणें ह्मणजे, सर्वच गोष्टी कल्पनेच्या पलीकडे व त्या सिद्धीस जाण्याची आशाच नसावयाची. देशांत नीतिमत्ता जागी ठेवण्याची जर इच्छा करणें आहे व तशी इच्छा असणें अवश्यही आहे तर, त्याजबरोबरच देशांतली संपत्तिमत्ताही जय्यत राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कारण, संपत्तिमत्तेवांचून नीतिमत्ता राखण्याचा सुसंभव नाहीं. देशामध्यें संपत्ति पाहिजे व नीतिही पाहिजे. नीति राखण्यास संपत्तीवांचून मनुष्य पंगु आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, संपत्ति असली ह्मणजे तेथें नीति असतेच अशी गोष्ट मात्र खास नाहीं. परंतु, संपत्तीचा जर अभाव

असेल तर तेथें नीतीचें वास्तव्य होण्याची मोठी मारामारच पडावयाची. दारिद्य आणि नीति यांची दोस्ती कोठेंच जमत नाहीं. आणि ती दोस्ती निदान मेवाडदेशांत वरील प्रसंगीं तरी जमण्याची बिलकुल आशा नव्हती. ह्मणून, राण्यानें आपल्या सहीचे जाहिरनामे प्रसिद्ध करून, परस्थळीं राहणाऱ्या व्यापाऱ्यांस व सावकारांस कळविण्यांत आलें कीं, त्यांनीं मेवाडांतल्या मुख्य मुख्य शहरांत आपले व्यापार आणि आपलीं देणींघेणीं खुशाल व बिनदिक्कत चालवावीं. राण्यानें हे आपल्या सहीचे जाहिरनामे प्रसिद्ध करण्याचें मनांत आणिलें तेव्हां प्रथमच त्याला शंका आली कीं, आजपर्यंत आपल्या देशाच्या दु:स्थितीमुळें सावकार व व्यापारी वगैरे लोकांचा राजकुलीनांवरील विश्वास आणि भरंवसा उडाल्यासारखा झाला आहे; ह्मणून, त्यानें आपल्या जाहिरनाम्यांबरोबरच इंग्रजांच्या वकीलाचा जामीनकदबाही प्रसिद्ध केला. त्या जामीनकदब्यांत इंग्रजी वकिलानें असें जाहिर केलें होतें कीं, 'राणेसाहेबांच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व सावकार व व्यापारी लोकांनीं आपले व्यवहार चालविले असतां; त्यांत राणेसाहेबांकडून जर बेभरंवशाचें व अविश्वासाचें काम झालें तर त्याजबद्दलची जबाबदारी आमचेवर आहे, व त्याबद्दल आह्मी जामीन आहों.' आणि अशा प्रकारचे, इंग्रजी वकिलाच्या जामिनकीचे जाहिरनामे राण्यानें सर्व हिंदुस्थानांतील एकंदर व्यापारी शहरांत प्रसिद्ध केले. अशा प्रकारच्या जाहिरनाम्यांचा योग्य परिणाम होईल असें अगोदरच भविष्य झालें होतें. शहरोंशहरीं हे जाहिरनामे प्रसिद्ध झाले मात्र; सावकारांनीं आपल्या पेढ्यांच्या शाखा मेवाडदेशांतील मुख्य मुख्य शहरांमध्यें स्थापन करून दुकानें उघडलीं. आणि कित्येक शहरीं व गांवीं व्यापाऱ्यांनीं आपले अडत्ये ठेवून व्यापाराची घडामोड चालविली. त्या लोकांना मग आपलीं घेणींदेणीं आणि व्यापारटापार चालविण्यास शंका किंवा संशय कसा तो न राहिल्यासारखा झाला. देशाबाहेरील व्यापारास ज्या कित्येक अडचणी व अडथळे होते ते सर्व नाहींसे करण्यांत आले. व ठिकठिकाणीं निर्गत मालावर जबरदस्त दस्तुऱ्या व कर घेण्यासाठीं जीं नाकीं बसविलीं होतीं तीं दरोबस्त उठवून दिलीं. मेवाडच्या सरहद्दीवर मात्र निर्गत मालावर जकात घेण्याचीं नाकीं कायम केलीं. देशांतल्या देशांत कर, दस्तुरीवांचून व्यापार चालण्याच्या सर्व प्रकारच्या सोयी करण्यांत आल्या. पहिल्यापहिल्यानें, देशांतलीं दस्तुऱ्यांचीं नाकीं उठविण्यांत आल्यामुळें व कर वगैरेंच्या आकारणींत फेरफार केल्यामुळें, राण्याचे उत्पन्नांत शेंकडा ३० पासून ५० टक्क्यापर्यंत तूट आली. परंतु, पुढें त्याच नमुन्यावर कांहीं दिवस मोठ्या जोरानें व्यापारधंदे चालल्यावर, राण्याचें उत्पन्न थोड्याच वर्षांनीं पूर्वीं कधीं वाढलें नव्हतें इतकें वाढून, देशामध्यें संपत्तीला चांगली बर्कत आली व चोहोंकडे आबादानी झाली. हें जें इंग्रजांनी मुख्य

काम करावयाचें होतें तें त्यांनीं केलें व त्याचें फळ त्या देशांतले लोक आजपर्यंत उपभोगीत आले आहेत.

मेवाडांतील व्यापाराची मुख्य पेंठ ह्मटली ह्मणजे भिलवाडा नांवाचें शहर आहे. तें अगदीं ओसाड पडलें होतें. परंतु मेवाडांतील व्यापारास व सावसावकारीस राजाचें रक्षण मिळाल्याबद्दलचें प्रसिद्ध झाल्याबरोबर थोडेच महिन्यांत भिलवाड्याचा ओसाडपणा जाऊन, तेथें १२०० घरांची वस्ती झाली. ह्या वस्तींतील अर्धेअधिक लोक तर परदेशीय व्यापारीच होते. जेथें थोडे दिवसांपूर्वी धान्याचा एक दाणाही मिळण्याची पंचाईत होती त्या भिलवाड्यांत, दूर दूर प्रदेशांत उत्पन्न झालेल्या धान्यांच्या गोण्यांवर गोण्या येऊन पडल्या; व त्यांचे एकसारखे, चोहोंकडे नवीन उगवलेल्या हिरव्या चार गवताच्या जमिनीवर ढीगच्या ढीग लागून राहिले. असें झालें तेव्हां भिलवाड्यास प्रतिआठवड्यांत एक जत्रा भरविण्याचें ठरविलें. त्या जत्रेंत मेवाडांत जो जिन्नस उत्पन्न झालेला असेल तो विकावयास येत असे. ह्या जत्रेंत येणाऱ्या कोणत्याही मालावर पहिल्या वर्षी जकात वगैरे कांहीं एक न घेण्याचा ठराव आणि माफीपत्र राण्याचे सहीशिक्क्यानिशीं प्रसिद्ध करण्यांत आलें. ह्याप्रमाणेंच आणखी ज्या कांहीं सुधारणा इष्ट व आवश्य वाटल्या त्या करण्यास राण्यानें इंग्रजी वकिलाच्या मसलतीनें हयगय व अनमान करूं नये. आणि पुढें पुढें, वकिलाची कोणतीही सूचना झाली कीं, त्याप्रमाणें ती लागलीच अमलांत येऊं लागली. लोकांनींच स्वतः आपल्यावर फौजदारी अधिकारी निवडून घेण्याची एक नवीन रीति इंग्रजी वकिलानें राण्याला सुचविली व ती त्यानेंही ताबडतोब कबूल केली. त्याचप्रमाणें, त्या फौजदारी अधिकाऱ्याला, आपला न्यायाचा अभिप्राय देणारे सभासद (असेसर) निवडून देण्याचाही नवीन हक्क लोकांस देण्यांत आला. आणि येणेंकरून, राण्याच्या प्रजेला जितकें स्वातंत्र्य देववलें तितकें देण्यास बिलकुल हयगय झाली नाहीं. राण्यानें दिलेल्या ह्या स्वातंत्र्याचा रयतेनें नीट रीतीनें उपभोग घ्यावा व त्यांस कोणत्याही प्रकारें कोणीं हरकत करूं नये ह्मणून, राण्याकडून त्या संबंधाच्या बंदोबस्ताची आणखी विशेष व्यवस्था करण्यांत आली. लोक ह्या स्वतंत्रतेप्रमाणें चालावे ह्मणून त्यांजवर देखरेख करणारा एक दरबारचा थोर अधिकारी नेमण्यांत आला. सारांश, लोकांना स्वतः आपला स्वतंत्रपणा समजूं लागण्याविषयींच्या जेवढ्या योजना करणें आवश्य होत्या तेवढ्या योजना राण्यानें आपल्या दोस्त इंग्रजी वकिलाच्या सूचनेप्रमाणें करण्यास बिलकुल हयगय केली नाहीं. सन १८२२ सालीं भिलवाडा येथें ३,००० घरांची वस्ती झाली. ही वस्ती बहुतकरून व्यापारी, सावकार व कारागीर या लोकांचीच होती. लोकांची वस्ती जशी वाढत चालली तशी त्या शहरच्या मध्यभागीं

एक स्वतंत्र नवी पेंठच बांधून, त्या पेंठेंतील घरें व दुंकानें बेताचीं भाडीं घेऊन लोकांस रहायाला व आपला उद्योगधंदा चालवायला देण्याची व्यवस्था केली; आणि कित्येक घरें तर, तीं ज्या जमिनींवर बांधलीं होतीं त्या जमिनींचे परागंदा झालेले मालक परत भिलवाड्यास राहण्यासाठीं आल्यावर व त्यांनीं त्या इमारतींची किंमत दिल्यानंतर त्यांस तशींच देण्यांत आलीं. आतां, ही गोष्ट जशी खरी आहे कीं, सुखाचे पोटांत दुःखाचें मिश्रण असावयाचेंच, त्याचप्रमाणें, येथपर्यंत जी मेवाडची स्थिति सांगितली तींत कांहीं तरी अस्वस्थतेचा व असमाधानाचाही प्रकार होताच. व त्यामुळें, सर्वांनाच एकसारखें सुख व समाधान मेवाडांत मिळत होतें असें ह्मणतां येणार नाहीं. भिलवाडा शहराची दिवसेंदिवस भरभराट होत चालली हें पाहून इतर ठिकाणच्या लोकांस त्याबद्दल ईर्षा वाटून, त्यांनीं आपलीं शहरें व गांवें त्यासारखीं किंवा त्यापेक्षांही जास्त योग्यतेला आणण्याच्या प्रयत्नास लागणें शहाणपणाचें झालें असतें. परंतु तसा प्रकार न घडतां, इतर ठिकाणच्या लोकांस भिलवाड्याचे संबंधानें मत्सर उत्पन्न होऊन, त्याला कमीपणा येईल अशा प्रकारचे उद्योग त्यांनीं आरंभिले. भिलवाड्याची दिवसेंदिवस जास्त जास्त भरभराट होण्याला मुख्य कारण, जे परदेशीय व्यापारी तेथें येऊन राहिले होते व सर्व व्यापार त्यांनींच आपले ताब्यांत ठेविला होता, त्यांचेविषयीं लोकांचे मनांत विशेष मत्सर उत्पन्न झाला. त्यांना कोणीकडून तरी खालीं आणावें असे राण्याचे दरबारांतही यत्न चालले. पुढें ह्याविषयीं भवतिनभवति होऊन असें ठरलें कीं, जेसलमीर, सुरत, काशी किंवा दिल्ली येथून जे व्यापारी मेवाडांत येतील त्यांजपासून जी जकात किंवा दस्तुरी घ्यावयाची ती भिलवाड्याच्या रहिवाशी व्यापाऱ्यांपेक्षां कमी घेत जावी. हा ठराव सर्वच दरबारी लोकांना पसंत पडला, व त्यांनीं भिलवाड्याच्या लोकांची एक वेगळीच जात मानण्याचें ठरविलें. आणि येणेंप्रमाणें, भिलवाड्याच्या लोकांपासून इतर ठिकाणच्या लोकांनीं आपल्याला अगदीं भिन्न मानण्याची वहिवाट पडली. ही वहिवाट पुढें इतकी कायम होत चालली कीं, ती मोडून भिलवाड्याच्या लोकांचें व इतर लोकांचें ऐक्य होण्याची आशाच नाहींशी झाली. भिलवाड्यांत जे व्यापारी होते त्यांजमध्यें दोन धर्मपंथ होते. कांहीं वैष्णवपंथी होते व कांहीं जैनधर्मी होते. त्या प्रत्येक पंथाचा एक मुख्य ह्मणून असे; व शिवाय त्यांच्यांतील वाद, तक्रारी वगैरेंचे निकाल करण्यासाठीं त्यांचे त्यांचे पंच असत. ते भिलवाड्यांत सर्व सामाजिक व्यवस्था बिनबोभाट ठेवीत. हे पंच शहाणे व समंजस असून, युक्तिवादानें आपल्या शहरांतील तंटेबखेडे मोडीत. असें जरी होतें तरी, त्यांचे धर्मसंबंधी वाद मोठे प्रबळ होते, व ते वाद आपसांत कधींच मिटले नाहींत. प्रत्येक पंथाचे लोकांस आपला पंथ श्रेष्ठ असा

ल्ल्हटून, त्या अभिमानेंकरून तें अतिशय कडाक्यानें भांडत; व ते वाद राण्याचे दरबारापर्यंत देखील जाऊन पोंचत. तेथें तरी त्यांच्या तंट्यांचा व्हावा तसा निकाल होत असे असेंही नाहीं. कोठेंही गेलें तरी धर्मपंथसंबंधाचा वाद निकालास लागून उभय पक्षांचें समाधान होईल असा संभव नसतोच; व त्याचप्रमाणें भिलवाड्याच्या उभयपंथी व्यापाऱ्यांच्या तंट्याचा उभयपक्षांस मान्य होईल असा निकाल कधींच मिळाला नाहीं. भिलवाड्याच्या व्यापाऱ्यांची इतर गोष्टींतील एकजूट, त्यांचें ऐकमत्य, वगैरे अनुकरणीय आणि प्रशंसा करण्यासारखीं होतीं. परंतु त्यांचा हा आपसांतील धर्मपंथसंबंधी वाद त्यांच्या वरील गुणांना मोठा धक्का बसविण्यासारखा होता. व तेणेंकरून त्यांच्या ऐक्यांत अनेक प्रकारचीं कुलंगडीं उत्पन्न करण्यास दरबारच्या विघ्नसंतोषी लोकांना बरीच चांगली संधि मिळण्याचा संभव होता. पुढें मग युक्तियुक्तीनें त्यांच्यांमधील धर्मसंबंधी वाद मिटविण्यांत आले. व त्याकरितां एके वेळेस तर त्यांना असेंही सांगावें लागलें कीं, 'तुह्मी जर समजुतीच्या रस्त्यानें न चालतां हा आपसांतील धर्मसंबंधी कलह असाच चालवाल तर तुह्माला एकदम भिलवाड्यांतून हुसकून देण्यांत येईल.' परंतु हा अखेरचा प्रसंग त्यांनीं येऊं दिला नाहीं. तसा प्रसंग आला असता तर त्यांत कोणत्याच पक्षाचें हित झालें नसतें, हें ते पक्कें समजून होते. असो. कसेंही करून त्यांचा आपसांतील धर्मपंथसंबंधी वाद राण्याकडून मिटविण्यांत आला खरा; परंतु ह्या वादामुळें, आणि ते वाद दरबारापर्यंत गेल्यामुळें, हा मोठा तोटा झाला कीं, भिलवाडा हें मध्यहिंदुस्थानांत जी मोठी व्यापाराची पेंठ होण्याची आशा होती, ती मात्र व्यर्थ झाली. तरी पुढें तीन वर्षांनीं ह्मणजे १८२५ सालीं, भिलवाड्याला बरेंच चांगलें रूप येऊन तें चांगल्या प्रतीचें व्यापाराचें आणि कलाकौशल्य व उदीमधंद्याचें नांव घेण्यासारखें शहर बनलें.

येणेंप्रमाणें, मेवाडदेशाला चांगलें नांवारूपास आणण्यासाठीं एकदम जे तीन उपाय चालविण्यांत आले, त्यांतील उद्योगधंद्यांच्या संबंधानें कशी काय व्यवस्था करण्यांत आली ती येथपर्यंत सांगितली. आतां राजकीय व्यवस्था कशी काय करण्यांत आली ती सांगणें आहे. ती व्यवस्था करणें फारच कठिण होतें. मेवाडदेशांतल्या शेतकरी आणि व्यापारी लोकांस फक्त राजरक्षण आणि उत्तेजन यांचीच काय ती जरूर होती. व ती जरूर इंग्रजांनीं होईल तितकी भागविली. जकाती, कर, वगैरे कमी करून ज्यांना उत्तेजन द्यावयाचें होतें तें इंग्रजांनीं राण्याला शिफारशी करून होईल तितकें देवविलें. व देशांत उद्योगधंदे, व्यापार, शेतीभाती, सुरळीतपणें आणि सुयंत्र चालतील अशी तजवीज करण्यांत आली. अशी तजवीज करणें झटलें ह्मणजे राज्यरक्षणासही उत्तम व फायदेशीर होतें. परंतु तिचा संबंध राज्यरक्षणाकडे

न दाखवितां, हें काम ह्मणजे, देशांतील उद्योगधंदेवाल्यांवर मेहेरबानीखातरच, करण्यांत येत आहे, असें बाह्यतः दाखविलें. ही गोष्ट इतर लोकांविषयीं झाली. पण देशांतलें मांडलिक, ठाकूर, सरदार आणि उमराव यांची सुव्यवस्था करणें ह्मणजे कांहीं त्यांजवर मेहेरबानी करण्याचा भाग नव्हताच. ते प्रत्यक्ष राज्यरक्षणाचीं द्वारें आणि साधनेंच होते. त्यांनीं उदेपुरच्या राज्यरक्षणासाठीं आजपर्यंत जे यत्न केले व ज्या नुकसानी सोसल्या त्यांचा मोबदला त्यांस काय मिळाला होता? उदेपुरच्या गादीचें पूर्ण हित इच्छिणारे कोटारियोच्या ठाकुरासारखे, कीं ज्यांना उदेपुरच्या गादीकरितां सर्व कांहीं करण्याची उमेद होती, कांहीं न करण्यासारखें असें त्याचे मतानें कांहींच नव्हतें, अशा राजनिष्ठ लोकांची कांहीं तरी सुव्यवस्था लावून देणें हें एक मुख्य व आवश्य काम होतें. आतां देवगड, साळुंब्रा किंवा बेदनूर येथील ठाकुरांनीं आपल्या राण्याच्या पडत्या काळांत त्याचे राज्याची विशेष पर्वा न करितां आपल्या आपल्या प्रांताचें रक्षण आणि जिंदगीचा बचाव, परकीयांपासून मदत मिळवून किंवा दुसरीं कांहीं कुलंगडीं व घालमेल्या करून अथवा स्वतः कांहीं पराक्रम गाजवून, केला. त्यामुळें, त्यांचें पूर्ववत् राण्याला साह्य मिळून त्यांनीं उदेपूरच्या गादीविषयीं अभिमानी व्हावें ह्मणून त्यांशीं बोलणें करावयाचें झटलें तर ते सांगतील त्याप्रमाणें त्यांचें ह्मणणें कबूल करणें राण्याला भाग होतें. गेल्या पन्नास वर्षांत राण्याचे हिशेब वगैरे कांहीं झाले नसून जमाखर्चाचा ताळेबंद नव्हता व त्या संबंधानें त्यांच्याही देण्याघेण्याचे बाबतींत कांहीं घोंटाळे राहिले होते. हें कांहीं जरी होतें तरी, त्या सर्वांचें पूर्ववत् ऐक्य होणें आवश्य होतें. कारण ही सर्व मंडळी ह्मणजे मेवाडच्या राज्याचे मुख्याधारस्तंभ होते. हे स्तंभ मध्यंतरीं बेबंदशाही झाल्यामुळें डळमळीत झाले होते; परंतु त्यांस पुनः स्थिर व मजबूत करण्यास आपले नवीन दोस्त इंग्रज लोक फार उपयोगी पडतील अशी राण्याला पूर्ण खात्री होती. आणि तशी सर्वांची एकवाक्यता होण्यांत सर्वांचाच नफा होता. राण्याला जसें इंग्रजांकडून सर्व प्रकारचें रक्षण मिळालें होतें तसेंच तें त्याचेबरोबर त्याचे इतर सरदारांस व उमरावांसही मिळण्याची पंचाईत नव्हतीच. सर्व सरदार आणि ठाकूर ह्यांचीं ह्मणणीं काय आहेत तीं ऐकून घेऊन त्या सर्वांचें समाधान करून त्यांची व राण्याची एकवाक्यता करण्याचें काम मोठें कठिण होतें. आपला अमुक प्रांत किंवा अमुक हक्क न गमावतां उलट त्यामध्यें जास्त भर पडावी हा ज्याचा त्याचा हेतु असणें स्वाभाविकच होतें. राण्याला वाटावें, अमुक प्रांत आपल्याकडे जास्त यावा; सरदारांना वाटावें, अमुक जहागीर किंवा नेमणूक आह्मांला जास्त मिळावी. असा ज्याचा त्याचा ज्यास्त भाग बळकावण्याचा उद्देश. तेव्हां, अशा स्थितींत त्या उभयतांचें

सख्य व प्रेम जुळवून, राज्याला खंबीरपणा आणावयाचा होता. तसेंच, फार पूर्वीपासून चोंडावत आणि सुक्तावत या उभय पक्षांत असलेलें वैमनस्य मोडणें तर फारच कठिण होतें. गोव्याघ्रांना निर्वैर करून एका पात्रांतून त्यांस खाण्यांपिण्यास लावण्याचें काम सोपें होतें; परंतु वरील दोन पक्षांमध्यें निर्वैरता आणणें अतिशय कठिण होतें. आणि त्यांचें ऐक्य झालें ह्मणजे राण्याचें व एकंदर मेवाडदेशाचें कल्याण हटकून झालें असें समजण्यास जागा होती. परंतु तें व्हावें कसें ? त्या दोन्ही पक्षांचे अभिमान आणि आग्रह फार जोराचे होते. आणि, मेवाडची स्थिति पुनः सुधारावयाची नाहीं तर असा सर्वांचाच ग्रह झाला होता. सुक्तावत पक्षाचा मुख्य जोरावरसिंग ह्मणून होता; त्याणें तर असें उघड बोलून दाखवावें कीं, 'साक्षात् आकाशांतून परमेश्वर जरी खालीं उतरला तरी आतां मेवाडदेशाला पूर्ववैभव येणें नाहीं.' तेव्हां अशा निराश झालेल्या व आग्रही पक्षांचा समेट व्हावा कसा, ही मोठी पंचाईत होती.

अशा स्थितींत सर्वांचें ऐक्य होण्यासाठीं अगोदर काय काय तजविजी कराव्या लागल्या हें खुलासेवार सांगणें ह्मणजे बऱ्याच विस्ताराचें काम आहे. अनेक वेळीं अनेक सभा भरल्या आणि त्या पुनः तहकूब झाल्या. असा प्रकार झाल्यामुळें, परस्पर विरुद्ध पक्षांतील एकमेकांविषयींचा भेदभाव व द्वेष कायम राहूं लागला. ता० २७ एप्रिल रोजीं भरलेल्या सभेंत इंग्रजांबरोबर झालेला तह वाचून दाखविण्यांत आला; व त्यामुळें त्यांचें व आपलें नातें आतां कोणत्या प्रकारचें झालें आहे तेंही सांगण्यांत आलें. नंतर ती सभा तहकूब करून एक लेख तयार करण्यांत आला. त्यामध्यें मुख्य राण्याचा व त्याचे सरदार, अमीर, वगैरेंचे अधिकार व त्यांचीं परस्पर कर्तव्यें कोणतीं यांचें खुलासेवार विवेचन करून, तो लेख वाचून दाखविण्यासाठीं सर्व सरदार वगैरेंची सभा भरविण्याचें व त्या लेखावर त्या सर्व सरदार वगैरेंची संमती घेण्याचें ठरलें. ता० १ मे ह्या दिवशीं ही सभा भरण्याचें ठरलें होतें, व त्याप्रमाणें ती भरली. सर्व सरदार जमले व वर लिहिलेला लेख त्यांस वाचून दाखविण्यांत आला. त्याचीं अकरा कलमें होतीं. त्या प्रत्येक कलमाबद्दलचा त्या सभेमध्यें वादविवादपूर्वक शांततेनें विचार झाला. तरी त्यांत निरर्थक वाद व भलभलते आक्षेप निघून, पुढें, त्या मंडळींतील प्रमुख वक्ता देवगडचा गोकुळदास याचे सूचनेवरून, त्या दिवशींची सभा तशीच तहकूब करण्यांत आली. त्यांचा असा विचार ठरला कीं, 'गोकुळदास याचे घरीं खाजगी रीतीनें मंडळीनें जमून जे आक्षेप निघाले आहेत त्यांचा विचार करावा आणि दुसऱ्यानदा ही सभा भरावी'. ह्या प्रमाणें जें काम ताबडतोब उरकून जावयाचें त्यास विनाकारण विलंब लागल्यामुळें, ह्या कृत्यास जास्त जास्त हरकती व लोकांच्या असंमति येण्याचा संभव दिसूं लागला. वरील लेखांतील

दुसरें आणि तिसरें कलम तर त्या लोकांना फारच विचाराचें असें वाटूं लागलें, व त्यावर अनेकांचे अनेक तर्कवितर्क निघूं लागले. ते त्यांचे सर्व तर्कवितर्क नाहींसे करणें मोठ्या महत्वाचें काम होतें. ता० ४ मे रोजीं दुपारीं राजदरबारचा थोरला दिवाणखाना पुनः सर्व सरदार वगैरे लोकांनीं गच्च भरून मोठी थोरली सभा जमली. त्या सभेंमध्यें राणा, त्याचे मुलगे आणि त्याचे मंत्री हे आपापल्या जाग्यांवरून बसले होते. नंतर पुनः त्या लेखांतलीं सर्व कलमें वाचून दाखविण्यांत आलीं व त्यांवर पुनः वादविवाद सुरू होऊन त्याबद्दलचा बराच खल झाला; आणि, असा खल होण्यांतच मध्यरात्र झाली. तरी कोणी सभा तहकूब करण्याविषयीं बोलेना. तेव्हां गोकुळदास याणें, 'रात्र फार झाली, सभा तहकूब करावी' ह्मणून प्रश्न काढला. हें त्याचें ह्मणणें, राण्याचा दिल्ली येथील मुखत्यार वकील येईपर्यंत एकसारखें चाललें होतें. परंतु तो येऊन पोंचल्याबरोबर गोकुळदासाचे ह्मणण्यास कोणीच कबूल होईना. तेव्हां राण्यानें गोकुळदासाला कळविलें कीं, 'तुह्माला पाहिजे तर सभेंतून उठून जा, आणि आपण कसे राजभक्त आहांत हें ह्या सर्व जमलेल्या मंडळीला दाखवा!' असें राण्याचें बोलणें ऐकून गोकुळदासाचें तोंड बंद झालें. नंतर शेवटीं, बैगूच्या ठाकुरानें त्या तयार केलेल्या लेखावर आपल्या संमतीची पहिल्यानें सही केली. असें करण्यांत त्याला आपला कार्यभाग साधावयाचा होता. त्यानें सही केलेली बघून त्यांचे मागून अमाईत व देवगड येथील ठाकुरांनींही सह्या केल्या. आणि याचप्रमाणें, त्यांचे सह्यांनंतर बाकीच्यांनींही आपल्या सह्या केल्या. इतकेंच नव्हे; तर त्यांनीं ज्यां आपल्या आप्तस्वकीयांस त्या दिवशीं आजारीपणामुळें वगैरे सभेस येववलें नाहीं त्यांचे आपण मुखत्यार ह्मणून त्यांच्याही सह्या केल्या. येणेंप्रमाणें मुख्य सोळा सरदारांच्या व त्यांचे आप्तस्वकीयांच्या पहिल्यानें सह्या झाल्यावर त्यांच्या खालचें दुसऱ्या वर्गांतील जे शूर सरदार होते त्यांनींही आपल्या व आपल्यावर अवलंबून असलेल्या, परंतु त्या वेळीं तेथें गैरहजर असलेल्या अशा दुसऱ्या सरदारांच्याही, त्यांचे मुखत्यार ह्मणून, एकामागून एक सह्या करून, ते आपआपल्या जागीं बसले. आणि ह्याप्रमाणें हा सर्व समारंभ आटोपण्यास दुसऱ्या दिवशींची पहांट झाली! ह्मणजे ता० ४ मे रोजीं दुपारीं १२ वाजतां जी ही सभा भरली ती ता० ५ मे रोजीं सकाळीं ३ वाजतां उठली! ह्याप्रमाणें एकसारखें १५ तास सभेचें काम चाललें होतें. सर्व सह्यांचे शेवटीं, ज्याचेविषयीं विशेष काळजी आणि संशय होता त्या सुंक्तावताचे ठाकुरानें आपली सही केली होती. पंधरा तास काम चालून सरदार लोकांना बराच कंटाळा आल्यासारखा झाला होता. व त्यांची त्यामुळें फार गैरसोयही झाली. परंतु त्या सर्वांनीं इतकी कळ सोसल्याप्रमाणें एकदांचा इष्ट हेतु सिद्धीस गेला, हें त्या चेंगट सभेपासून सुफल-

च मिळालें व तोच मोठा फायदा होता. ह्या सभेच्या वेळीं राण्यानें जो धीर आणि नेट दाखविला त्यावरून, त्याचे मनांतही आपल्या राज्यांतील दुफळी मोडून सर्वांची एकवाक्यता व्हावी व आपल्या राज्यकारभारास सुरळीतपणा यावा असें फार होतें, हें उघड दिसतें.

येणेंप्रमाणें, मेवाडच्या राज्यांत असलेलीं दुही व द्वैत हीं मोडून टाकण्याचे हे प्राथमिक उपाय झाले. आतां, ह्या जो सर्वांच्या एकविचाराचा तह[1] झाला त्या तहां-

---

१. राण्यानें जो ह्या तह ठरविला तो पुढें लिहिल्याप्रमाणें कलमवार आहे. त्यांतील कलमांचा भावार्थ अगदीं उघड उघड असल्यामुळें, त्याचे विषयीं कोणी संशय घेऊन वाद करील अशा प्रकारच्या आलीकडील कायदेकानू करणाऱ्या मंडळीचे धोरणाचा तो गूढार्थानें लिहिलेला नाहीं. व ह्यासाठीं, त्याबद्दल कोणाची भलतीसलती समजूत होण्याचा किंवा तशी समजूत करण्याचा मुळींच संभव नाहीं:—

"सिद्ध श्री महाराणाधिराज, महाराणा भीमसिंग यांजकडून,—माझे राज्यांतील सर्व सरदार, माझा "बंधुवर्ग व आप्तइष्ट, राजे, पाटील, झाला, चव्हाण, चोंडावत, पंवार, सारंगदेवत, सुक्तावत, राठोड "आणि राणावत वगैरे यांस.—

" गेल्या संवत् १८२२ (इ० स० १७७६) पासून, ह्मणजे, श्री उरसिंगजी हे राज्यारूढ "होते तेव्हांपासून, मेवाडदेशांत अस्वास्थ्य उत्पन्न झालें आहे. जुन्या वहिवाटी आणि कारभार "सर्व मोडले जाऊन, भलत्यांनींच भलत्यांचे मुलूख, जमिनी वगैरे बळकाविल्या. यासाठीं आज, "वैशाख वद्य १४, संवत् १८७४ (इ० स० १८१८) रोजीं आह्मी आपल्या सर्व सरदार, मान- "करी व मांडलिक ठाकूर वगैरेंची सभा भरवून, त्यांना आपापलीं कर्तव्यें सन्मार्गानें करण्यासाठीं "नवीन रीतीचा व तऱ्हेचा एक ठराव जाहीर करतों:—

"१.—राण्याच्या मालकीच्या ज्या जमिनी व जे मुलूख वरील अस्वस्थतेच्या[1] वेळेपासून ज्या "कोणाकडे गेले असतील, अथवा एका सरदाराच्या किंवा ठाकुराच्या जमिनी वगैरे ज्या दुसऱ्या "कोणा सरदाराकडे किंवा ठाकुराकडे गेल्या असतील त्या सर्व ज्याच्या त्यास परत करण्यांत याव्या.

"२.—वरील अस्वस्थतेच्या काळापासून रखवाली, भूम व लेगत हे जे कर[2] बसविण्यांत आले "आहेत ते ह्यापुढें उठविण्यांत आले आहेत.

"३.—धन[3] आणि बिस्व हे फक्त राण्याचे हक्क, ते उठविण्यांत आले आहेत.

"४.—कोणत्याही सरदारांनीं किंवा ठाकुरांनीं आपल्या आपल्या हद्दींत जुलूम, जबरदस्ती व "चोऱ्या किंवा लुटालूट करूं नये किंवा करूं देऊं नये. त्यांनीं आपल्या हद्दींत ठग, वाटमारे, "लुटारू, (जसे—मोगी, बावडी व थोडी वगैरे) यांस राहूं देऊं नये. परंतु जे आपला तो धंदा सो- "डून निरुपद्रवीपणानें देशांतील इतर उद्योग वगैरे करून राहतील त्यांस राहण्यास परवानगी

---

१. मेवाडांत पहिल्यानें जें बंड व अस्वस्थता झाली ती याच राण्याचे कारकीर्दींत झाली.

२. हे कर अनुक्रमें लोकसंरक्षण, जमीनहक्क व कर्जें यांच्या संबंधानें बसविले होते.

३. ह्या दोन्ही रहदारीच्या जकाती होत्या.

तील प्रत्येक कलमाप्रमाणें ज्या गोष्टी अमलांत यावयाच्या त्या अर्थात् एकदम कांहीं अमलांत येण्याचा संभव नव्हता. हळू हळू त्या सर्व गोष्टी अमलांत यावयाच्या होत्या.

"द्यावी. आणि त्यांतून जर कोणी लोक पुनः आपला पूर्वीचा लोकांना नागविण्याचा किंवा लोकांचें "शांतिस्वास्थ्य बिघडविण्याचा धंदा चालू करतील तर त्यांचें डोकें उडवावें व त्यांनीं लुटीमध्यें "मिळविलेला पैसा किंवा इतर वस्तु त्यांजकडून घेऊन ज्याच्या मुलखांत त्या लुटी वगैरे झाल्या "असतील त्यांनीं जप्त कराव्या.

"५.–देशांतले किंवा परदेशांतले उदमी, व्यापारी, काफले,[1] वंजारी[2] आणि इतर जे कोणी आ-"पल्या मुलखांत येतील किंवा आपल्या मुलखांतून फिरतील त्यांचें रक्षण करावें. त्यांस कोणत्याही "प्रकारचा उपद्रव होऊं न पावे अशी व्यवस्था ठेवावी. हा नियम जे कोणी पाळणार नाहींत व "व्यापारी उदमी यांस जे उपद्रव देतील, त्यांची सर्व जिंदगी जप्त करून सरकारच्या खजीन्याकडे "दंडादाखल जमा करण्यांत येईल.

"६.–जसा हुकूम होईल त्याप्रमाणें, मेवाडांत किंवा मेवाडच्या बाहेर, सरदार वगैरेंनीं "आपापल्या नौकऱ्या केल्या पाहिजेत. सरदार व ठाकूर यांचे चार भाग करून, प्रत्येक "भागानें तीन तीन महिने दरबारच्या नौकरीस हजर असलें पाहिजे. प्रत्येक भागाची "तीन महिने नौकरी झाली ह्मणजे त्या भागांतील सर्व सरदारांस नऊ महिनेपर्यंत आपआपल्या "मुलखांत जाण्याची परवानगी मिळेल. मात्र, वर्षांतून दसऱ्यासाठीं सर्व लोकांनीं आपआपल्या "इतमामांसह उदेपुरास एकत्र जमलें पाहिजे.[3] दसऱ्याचे पूर्वी १० दिवस आणि दसऱ्यानंतर २० "दिवस असा एक महिना, त्यांनीं आपल्या नौकरीशिवाय उदेपूर राजधानीमध्यें घालविला पाहिजे. "नंतर मग त्यांस आपल्या मुलखांत जाण्याची परवानगी मिळेल. जरूरीच्या प्रसंगीं किंवा दु-"सऱ्या कोणत्याही वेळीं, दरबाराला वाटल्यास, वाटेल त्यांस बोलावणें होईल व त्या बोलावण्याप्रमाणें "सर्वांनीं आपआपल्या नौकरीवर हजर झालें पाहिजे.

"७.–प्रत्येक पट्टावत यानें दरबाराकडून स्वतंत्र पट्टा घेत जावा.व त्यानें स्वतंत्रपणें दरबारची "नौकरी करावी. त्याचा थोरल्या पट्टावताशीं कांहीं संबंध राहावयाचा नाहीं व त्यानें त्याच्या हाताखालीं "ह्मणून नौकरी करावयाची नाहीं. सर्व सरदारांचे पोटांत दुसरे जे कोणी मदतगार असतील "ते, त्यांचे जवळ असलेल्या पट्टावतांशीं लगटून किंवा अवलंबून असले पाहिजेत.[4]

---

१. उंटें, बैल किंवा गाड्या घेऊन जमावानें व्यापाराच्या खेपा करीत हिंडणारे लोक.

२. बैलांचे तांडे घेऊन धान्य, मीठ, यांचे व्यापार करीत हिंडणारे लोक.

३. दसऱ्याचे दिवशीं सर्व सरदार वगैरेंची राणा स्वतः हजिरी घेतो, आणि नंतर त्यांचे सन्मानार्थ पोषाख वांटून त्यांना पदव्या वगैरेही देतो, असा संप्रदाय आहे.

४. हें सातवें कलम विशेष महत्वाचें होतें. सरदार किंवा ठाकूर यांचे हाताखालील लोक आपआपल्या वरिष्ठाशीं मात्र मोठ्या आज्ञाधारकपणानें वागत ह्मणजे झालें. त्यांना राण्याचा किंवा त्याचे गादीचा कोणत्याही प्रकारें अभिमान नसे व ते त्याविषयीं सन्मानबुद्धिही बाळगीत नसत. यासाठीं राण्यानें या कलमानें त्या सर्वांचा प्रत्यक्ष राजगादीशीं निकट संबंध आणून ठेविला.

एकंदरीमध्यें, झालेल्या तहांतलीं कलमें बऱ्याच महत्वाचीं होतीं. व त्याप्रमाणें सर्व गोष्टी, हळू हळू तरी पण, अमलांत येण्याची आवश्यकता होती. त्या गोष्टी अमलांत येण्यास पुढें कित्येक महिने लागले; पण, त्यांत कांहीं आश्चर्य करण्यासारखें नव्हतें. आश्चर्य जें वाटावयाचें तें हें कीं, ह्या राजाप्रजेच्या तहांतल्या कलमांप्रमाणें ज्या गोष्टी अमलांत आल्या त्या, यद्यपि उशीरानें अमलांत आल्या तथापि, त्यांचेसाठीं राण्याला आपल्या शक्तीचा किंवा शस्त्रास्त्राचा एकदांही उपयोग करावा लागला नाहीं. उदेपूर व उदेपूरच्या आसपास ५० कोशपर्यंत, लवकर किंवा उशीरां, राण्याचा ठराव तहांतल्या कलमांप्रमाणें अमलांत येण्यास कोणत्याही प्रकारची अडचण अथवा तक्रार आडवी आली नाहीं. पहिल्यानें वाटलें होतें कीं, हा तह सर्व सरदारांच्या सह्या वगैरे होऊन दप्तरीं दाखल झाला आहे खरा; परंतु त्याची अंमलबजावणी कशी काय होते कोण जाणे. कदाचित् त्या अंमलबजावणीसाठीं इंग्रजांच्या सोजरांचाही उपयोग करावा लागेल असा अजमास होता. परंतु तशा प्रकारचा कांहींच प्रसंग न पडतां, वर लिहिल्याप्रमाणें, हळू हळू सर्व मेवाडदेशांतल्या सर्व सरदारांनीं आणि लोकांनीं, तहांत ठरलेल्या कलमांप्रमाणें आपलें वर्तन राखण्यास अनमान केलें नाहीं. सरदारांची किंवा लोकांची ह्या तहामुळें कोणत्याही प्रकारची गैरसोय नव्हतीच. अशा प्रकारच्या तहाची कल्पना अर्थात् इंग्रजी वकिलाची असून, वकिलाचे मनांत सर्व मेवाडदेशामध्यें एकचित्तता व एकवाक्यता असावी. ह्मणजे, इंग्रजांच्या राज्याची तीच बळकटी होय. आणि ही बळकटी आणण्यासाठीं त्यांना जें जें

" ८.–महाराण्याकडून प्रत्येक सरदाराचा व ठाकुरचा त्याचे योग्यतेप्रमाणें सर्व प्रकारचा मान-
"सन्मान राखला जाईल.

" ९.–रयतेवर कोणत्याही प्रकारचा जुलूम जबरदस्ती होणार नाहीं. त्यांचेवर नवीन प्रका-
"रचे कर वगैरे लादण्यांत येणार नाहींत व त्यांजकडून वाटतील तसे दंडही घेण्यांत येणार नाहींत.

" १०.–ठाकुर अजितसिंग याणें इंग्रजांबरोबर जे ठराव केले आहेत व जे आह्मी कबूल केले
"आहेत ते सर्वांनीं कबूल व मान्य केले पाहिजेत.[1]

" ११.–ह्याप्रमाणें वर्तन ठेवण्यांत जर कोणाची चूक होईल अथवा कोणी अनमान व हयगय
"करील तर त्यास आह्मी शिक्षा करूं. मग त्याबद्दलचा बोल आह्मांकडे राहणार नाहीं. हे सर्व
"नियम जो कोणी मोडील त्यास राजशासनाशिवाय एकलिंगाची व खुद्द महाराण्याची शपथ आहे."

येणेंप्रमाणें वरील तहाचा लेख आहे, व त्याचे खालीं तो सर्वांना संमत झाल्याबद्दलच्या मेवाडदेशांतील सर्व वर्गाच्या व प्रतीच्या एकंदर सरदारांच्या व ठाकुरांच्या सह्या आहेत. त्या सर्व येथें देण्याचें कांहीं कारण नाहीं.

१. ह्या कलमाचा संबंध राण्याचा इंग्रजांबरोबर जो तह झाला तो वकील अजितसिंग याचे मार्फतीनें झाला त्यांजकडे आहे.

करणें योग्य वाटलें तें तें त्यांनीं राण्याला सूचना करून होईल तितकें केलें. यामुळें इंग्रजांविषयीं रजपूत लोकांचें मत फार चांगलें होत चाललें. इंग्रजांना आपलें वजन राजस्थानांत बसविण्यास त्यांचें बल कांहीं कारण झालें नाहीं व तसें कारण व्हावयाचेंही नव्हतें. परंतु त्यांच्या वर लिहिल्या प्रकारच्या चांगल्या इच्छांनीं व तदनुरूप त्यांनीं दाखविलेल्या प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष वर्तनींनीं त्यांचें वजन सर्व राजस्थानांत वाढत चाललें. इंग्रजांच्या शिपायांचे बंदुकांतून निघालेल्या थोड्या गोळ्यांनीं शत्रूकडील लोक पटापट मरून पडावे, हा प्रकार बघून रजपुतांनीं आश्चर्य करून ह्मणावें कीं, '[1]इंग्रजांच्या अन्नाचाच हा गुण आहे.' वस्तुतः ह्मटलें असतां रज-

---

१. 'कंपनीसाहेबका निमकका जोरसे' हे शब्द प्रत्येक शिपायाचे तोंडीं बसलेले असत. जें कांहीं यश मिळतें आणि जे कांहीं आपल्याकडून पराक्रम होतात ते सर्व 'इंग्रजांचे अन्नाच्या जोरानें' होतात असा प्रत्येकाचा समज झाला होता. त्याचप्रमाणें कोठें कांहीं अन्याय, जुलूम वगैरे होत असलेला दिसला ह्मणजे लोकांनीं 'कंपनीकी द्वाही' असें ह्मणून शपथ घालावी. व जशी देवाची, आप्तइष्टांची, आईबापांची वगैरे शपथ घेतात किंवा घेववितात त्याप्रमाणें कंपनीची शपथ घेण्याचा परिपाठ पडला होता! 'हा असा विलक्षण परिपाठ पडेल असें,' कर्नल टॉड् ह्मणतो, 'सन १८१२ मध्यें कोणाच्या स्वप्नींसुद्धां नव्हतें !' टॉड् साहेब आणखी असें सांगतो कीं, 'आमच्या लोकांपैकीं एक सभ्य एकुणीस वर्षांचा तरुण रजपूत गृहस्थ नरवरच्या रानांत लुटारू लोकांनीं लुटलेला माल वगैरे आणून त्यांजवर आपला धाक बसविण्यासाठीं पाठविला होता. हा तरुण गृहस्थ भला लंबाचवडा होता. त्याची उंची त्याच वयांत सहा फूट होती. त्याचे बरोबर दुसरें कोणी नव्हतें. त्याला रानामध्यें सुमारें ५० लुटारू लोकांची एक टोळी भेटली; आणि त्या टोळीनें त्याला घेरून, त्याचा हत्ती मागितला. आणि 'नाहींतर तुझी आमच्या हातून सुटका होणार नाहीं,' अशी त्यांनीं त्याला भीति घातली. त्यांचें तें दरडावणीचें भाषण ऐकून त्या तरुण गृहस्थानें लगेच आपली बंदुक त्यांचेपुढें करून त्यांस कळविलें कीं, 'जोंपर्यंत ही कंपनी सरकारची बंदुक माझे हातीं आहे तोंपर्यंत तर मी तुह्मांस मोजणार नाहीं. तुमच्यांत सामर्थ्य असेल तर या पुढें.' ह्याप्रमाणें त्यानें मोठ्या आवेशानें त्यांस चापलें खरें; परंतु त्या बापड्या एकट्याचें त्या ५० दरो-डखोरांपुढें काय चालणार होतें ? त्यांनीं त्यांजवर हल्ला करून त्याला हत्यारांचे भयंकर वार करून जखमी केलें ! तेव्हां तो मृतप्राय होऊन त्या रानांत पडला. पुढें मग त्यास कोणी डोलींत घालून उदेपुरास असलेल्या इंग्रजी गोटांत आणिलें. त्याचे पाठीवर तर अशी एक आरपार जखम झाली होती कीं, त्या जखमेंतून त्याच्या आंतड्यांच्या क्रिया कशा काय चालतात त्या स्पष्ट दिसत होत्या! त्याचप्रमाणें त्याचे बाहु आणि त्याचीं मणगटें तर त्या दुष्टांनीं इतकीं ठेंचलीं होतीं कीं, त्याला तीं इकडचीं तिकडे हालवितांही येत नव्हतीं ! इतक्या भयंकर स्थितींत जरी तो होता तरी त्याचें धैर्य, त्याचा दृढ निश्चय, आणि त्याची समाधानवृत्ति हीं कांहीं विलक्षण होतीं. त्याला जेव्हां आमच्या कप्ताननें ह्मटलें कीं, 'इतके हाल तूं सोसून घेतलेस त्यापेक्षां तूं त्या लुटारूंचें ह्मणणें कबूल करून आंपला जीव बचवावयाचा होतास;' तेव्हां तो तिरस्काराची मुद्रा करून ह्मणाला, 'काय कप्ता-

पुत लोक शौर्यवीर्यांत कमी होते असें नाहींच. परंतु त्यांस इंग्रजांची सर्व प्रकारची सुव्यवस्था व बातबेत बघून, आपल्याला जें कांहीं यश मिळतें तें सर्व त्यांचे साहचर्य-योगानेंच मिळतें अशी त्यांची समजूत असे. सर्व लोकांत इंग्रजांचें वजन फार वाढलें होतें, व सर्वांना त्यांचेविषयीं आदरप्रयुक्त भीति होती. सारांश, हें सर्व त्यांच्या वजन-दारीचें काम होतें. आणि, रजपूत लोकांत इंग्रजांचें इतकें वजन वाढण्याचें कारण तरी इतकेंच कीं, त्या वेळीं त्यांनीं आपल्या वर्तनांत अप्रामाणिकपणा, अपहारबुद्धि, परकीपणा आणि कपटभाव बिलकुल दाखविला नाहीं. त्यामुळें, दिवसेंदिवस त्यांचे चांगुलपणाची कीर्ति जास्त जास्त पसरत चालली, आणि, त्यामुळेंच इंग्रजांचे राज्याचा पश्चिम दिशेकडे जो राज्यस्थापनयोग पुढें घडून आला त्याचा मूळ मजबूत पाया घातला गेला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इंग्रजांविषयींची सर्वत्र बढाई पुकारण्यास कोणी स्तुतिपाठक किंवा भाट यांची योजना केली नव्हती. तर, त्यांच्या त्या-वेळच्या सद्वर्तनाचा कीर्तिगंधच सर्वत्र पसरून त्याचा परिमल राजस्थानच्या दश-दिशा व्यापीत चालला होता. इंग्रजांच्या अमलांत रजपूत लोकांनीं **'सच्चा राज्य'** असें एक सर्वसाधारण नांव देऊन, त्यांचेविषयीं बोलावयाचें झालें ह्मणजे वरील नांवाचा उच्चार करून ते बोलत. इंग्रजांना तरी अशा उत्तम नांवापेक्ष आणखी कशाची आशा करावयास पाहिजे होती ?

एकंदर जुन्या राज्यकारभारांत नवी व्यवस्था करण्याचें मनांत आणिलें तेव्हां ती व्यवस्था एकदम होण्यास किती अडचणी व संकटें आलीं असतील हें सांगायाला नकोच. नवीन कांहीं सुधारणा करावयाच्या ह्मणजे जुन्या लोकांमध्यें त्याबद्दल असमाधान उत्पन्न व्हावयाचें व त्यांजकडून हरकती यावयाच्याच. मेवाडांतल्या जमिनींची मोजणीमापणी करावयाची होती. परंतु त्यामध्यें कितीएक वाद उत्पन्न झाले. अनेकांनीं आपले अनेक हक्क पुढें आणिले. कोणी ह्मणे, 'आमच्या अमुक अमुक जमिनी आमच्या वंशपरंपरेच्या मालकीच्या आहेत;' कोणी ह्मणे, 'अमुक अमुक कामाबद्दल आह्माला त्या सरकारांतून मिळाल्या आहेत;' व कोणी तर आपले खुलासेवार लेखच काढून दाखवून भांडत बसत. सारांश, एकासारखे एक असे हक्क दाखविण्यांत न येऊन, निरनिराळ्या रीतींनीं निरनिराळे लोक आपल्या मालक्या सांगत.

---

नसाहेब, मीं त्या दुष्मानांशीं न लढतां माझी ही बंदुक आणि मजजवळ होतें नव्हतें तें त्यांचे हवालीं केलें असतें ह्मणजे तुह्मींच माझा किती उपहास केला असता ?' पुढें त्या तरुण पुरुषाच्या जखमा बऱ्या होत चालल्या होत्या. परंतु त्याच्या मणगटांवरील कित्येक शिरा फारच ठेंचल्यामुळें, त्या दुःखांतच त्याचा पुढें अंत झाला ! कंपनीच्या जवळ असा एकच मोठा व प्रामाणिक रजपूत नव्हता. तर, असे हजारों लोक आपल्या कंपनीच्या बंदुकीचा अभिमान बाळगून मृत्यूला न भिणारे कंपूनीचे जवळ होते !

आणि त्यांतच राण्याकडून धरसोडगिरी चाले; कित्येकांचीं ह्मणणीं राण्यानें कबूल करावीं; कित्येकांचीं ह्मणणीं कानाआड टाकून आपल्याला जें करणें तें करावें; आणि कित्येकांच्या मालक्या मुळींच रद्द करून त्या सर्व सरकारी जमिनी आहेत असें प्रसिद्ध करावें. कोणीं फारच गयावया केली, किंवा कोणीं आपला जबरदस्त पुरावा आणिला, अथवा कोणीं फारच त्रागा करून राण्याला भीति उत्पन्न होण्यासारखी संतापानें दाद मागितली, ह्मणजे त्यानें त्या सर्वांच्या ह्मणण्यास आपली कबुली द्यावी. असा कांहीं प्रकार चालला होता. त्याबद्दलची शाश्वती अथवा नियमितपणा ह्मणून कांहीं नव्हता. कित्येकांनीं राजभक्तीमुळें असें समाधान मानून घ्यावें कीं, 'आपला राजा पुनः आपल्या गादीवर येऊन आपलें राज्य कायम झालें हीच गोष्ट काय थोडी आहे? त्याचे आश्रयाखालीं राहून आपला निर्वाह करावा आणि राजनिष्ठेनें रहावें ह्मणजे झालें. आज आपल्याला जें संरक्षण मिळत आहे व जे आपण आपल्या घरीं सुखांत आहोंत हाच आपल्याला मोठा फायदा आहे. यापेक्षां जास्त आशा बाळगून सरकाराशीं वाद घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' परंतु अशा पोक्त समजुतीचे लोक सर्वच होते असें नाहीं. आणि, अशा थोरपणाचे प्रौढ विचार जेथें सार्वत्रिक होतील तेथें मग कोणत्याही प्रकारची कमीजास्त सुधारणेची व्यवस्था करण्यास राजांना किंवा सरकाराला कठिणही पडणार नाहीं. पण अशी स्थिति असूं शकत नाहीं. जो तो आपल्या फायद्याकडे बघत असतो. मग त्यामध्यें दुसऱ्या कोणाला कांहींही अडचणी येवोत. सर्व समाजाचें ज्यामध्यें कल्याण, आणि सर्व समाजाची ज्यामध्यें व्यवस्था व सोय तेंच आपलें कल्याण आणि तीच आपली व्यवस्था व सोय, असें मानणारे उदारप्रकृतीचे लोक फारच थोडे असतात. राण्याशीं हे जमिनीसंबंधीं वाद भांडणारे रयत लोकांपेक्षां सरदार लोकच जास्त होते, व ह्मणून त्यांच्या त्या भांडणास विशेष वजन आल्यासारखें झालें होतें. असें झालें तेव्हां इंग्रजी वकिलानें कित्येक आठवडेपर्यंत एकेका सरदाराचे घरीं त्याची खाजगी रीतीनें भेट घेऊन त्याची समजूत घालण्याची मेहनत केली. ह्या भेटीमध्यें, ह्या वकिलाला निरनिराळ्या संस्थानिकाच्या व सरदाराच्या तब्यतीप्रमाणें धोरण ठेवून वागावें लागे. कोणाची शौर्यपराक्रमाचे संबंधानें स्तुति करून, 'तुमचे शौर्यपराक्रमानेंच मेवाडचें राज्य रक्षिलें गेलें', असें ह्मणावें लागे; कोणाचे पूर्वजाच्या मर्दुमकीचे पोवाडे गावे लागत; व कोणाची वाजवीपेक्षां फाजील स्तुति करून, व जणूं काय 'सर्व सुव्यवस्था करणें तुमचेच हातीं आहे' असें सांगून, त्यांचे मनांत असलेलें वैषम्य घालवावें लागे. . येणेंप्रमाणें, त्या वाद करणाऱ्या सरदार वगैरे लोकांशीं सलगीचें वर्तन ठेवून, शेवटीं त्या सर्वांमध्यें एकवाक्यता केली; व राण्याकडून ज्या गोष्टी होतील त्या आपल्या सर्वांच्या हिताच्याच होतील

अशी त्यांची खात्री केली. सारांश, धीराधीरानें, शांततेनें, आपसांतल्या आपसांत आणि कोणाचाही पक्ष न दाखवितां, वकिलानें, निष्पक्षपात वर्तणुकीनें इंग्रजांनीं जें हें मोठें यश मिळवलें होतें त्यास विशेष कायमपणा आणिला; व तेणेंकरून इंग्रजांविषयीं रजपूत लोकांमध्यें विशेष पूज्यबुद्धि उत्पन्न होत जाण्याला कारण झालें. लोकांना जेव्हां असें दिसलें कीं, ह्या नवीन व्यवस्थेंत कोणत्याही जातिवर्गाचे संबंधानें पक्षपात न होतां, एकंदर सर्वांच्याच हिताच्या ज्या गोष्टी त्या करण्यांत येत आहेत, तेव्हां हळहळू सर्वांचीच राण्याला संमति मिळत चालली. लोकांनीं भराभर आपल्या जमिनींवरचे हक्क व दावे सोडून दिले. ह्यांमध्यें कित्येक जमिनी खरोखर ५०।५० वर्षेंपर्यंत एकेकाचे वहिवाटीस होत्या. अशी स्थिति जेथें होती व जेथें व्यक्तीचे दृष्टीनें त्याचेवर आपत्ति येण्याचा संभव दिसत होता त्याजवर दया करून त्यांजकडून त्याच्या जमिनीवरील वारसा व हक्क सोडून घेण्याविषयीं विशेष आग्रह धरिला नाहीं. येणेंकरून गरिबांवर दया केल्यासारखेंही झालें. ज्यांच्याकडे किल्ले व अशाच दुसऱ्या रूपानें जमिनी वगैरे होत्या त्या राण्याला आपल्या ताब्यांत घेण्यास बऱ्याच अडचणी आल्या. कित्येकांस राण्याला ते किल्ले व जमिनी घेतांना त्यांच्या नुकसानीबद्दल पैसे द्यावे लागले. कित्येक सरदारांस व ठाकुरांस त्यांच्या हद्दींत आयात किंवा निर्गत मालावरच्या जकातींची माफी होती; व त्या माफीचा भोगवटा त्यांनीं सात सात पिढ्या घेतला होता. तेव्हां, ते सर्व राजकीय हक्क राण्याचे राण्याकडे येण्यास, राण्याला त्या त्या सरदारांशीं व ठाकुरांशीं वेगवेगळ्या सवलती व सोयी काढून सर्व मेवाडदेशांत आपला एकसारखा व अप्रतिबंध अंमल चालू करण्यास बऱ्याच खटपटी कराव्या लागल्या. देवगडच्या ठाकुरास, गेल्या सात पिढ्या, वर सांगितल्या प्रकारच्या जकातींची माफी होती. दुसरा भाइंदरचा ठाकूर, याजकडे त्याचे इनामाशिवाय आणखी ४३ शहरें व गांवें वहिवाटीला होतीं. अमाईत, भदेश्वर, डबला, लाव्हा व इतर ठिकाणच्या ठाकुरांकडे राण्याचे मोठमोठे किल्ले होते व त्या सर्वांचा ते स्वतंत्रपणें आणि आपल्या पूर्ण मालकीनें भोगवटा घेत होते; व याशिवाय त्यांचे दुसरे कित्येक हक्क व दुसऱ्या अनेक बाबी यांचे संबंधानें त्यांना पुष्कळ प्रकारांनीं सोडवणूक, स्वातंत्र्य व माफी असे. तेव्हां, हा सर्व पूर्वींचा राण्याचा अनधिकारसंबंध नाहींसा करून तो खरा व साक्षात् अधिकारी अशा रीतीनें आपला अंमल करण्यास लागायला, त्याला, वर लिहिल्याप्रमाणें निरनिराळ्या अनेक व्यवस्था करण्यास सहा महिने लागले. तेव्हां एकदांची सर्व मिसळ नीट लावून, मेवाडचा अधिपति राणा हाच आहे, असें सर्वांना नीटपणें कळूं लागलें.

वर लिहिल्याप्रमाणें राण्याला व्यवस्था करण्याचे संबंधानें ज्या लोकांकडून हरकती

आल्या व जीं संकटें उभीं राहिलीं त्यांत अर्झा येथील ठाकुराकडून वरील हरकत झाली. अर्झा येथील किल्ला व तो प्रांत अर्धशतकाचे पूर्वी उदेपूरच्या राण्याचे ताब्यांतच होता; परंतु तो राण्याकडून पुरावत सरदारांनीं बळकावला व पुरावतांपासून सुक्तावतांनीं हिसकून घेतला. आणि त्यांनीं राण्याला कायदेशीर मालकीच्या हक्काबद्दल १०,००० रुपये देऊन त्याबद्दलची आपल्या नांवें सनद करून घेतली. ह्याप्रमाणें सुक्तावतांकडे फुकटाफाकटी गेलेला अर्झाचा किल्ला व प्रांत त्यांजकडून परत घेण्याचें ठरून, त्याप्रमाणें सुक्तावतांचा प्रमुख जो भाइंदरचा ठाकूर त्याचा भाऊ फत्तेसिंग यास कळविण्यांत आलें. कोणाचेही ताब्यांत असलेली अल्प वस्तु सुद्धां आपल्या हस्तगत करून घेण्यास बहुतं संकटें व हरकती येतात. त्याप्रमाणें अर्झाचा किल्ला व प्रांत राण्याचे हातीं त्यानें मागितल्याबरोबर सहज रीतीनें आला नाहीं हें सांगणें नकोच. सुक्तावतांचा मुख्य जो भाइंदरचा ठाकूर याजपासून राण्यानें त्याजकडे असलेलीं ४३ शहरें व गांवें घेतलीं होतीं व त्यामुळें त्यांच्यामध्यें बरीच खलबल झाली होती. आणि त्यांतच राण्याकडून अर्झा प्रांत व किल्ला यांची फत्तेसिंगाकडे मागणी झाली. ह्यामुळें त्यांचेमध्यें बरेंच असमाधान उत्पन्न होऊन त्यांची मर्जी खपा झाली. परंतु करतात काय ? राण्यानें मागणी केल्याप्रमाणें त्याचे स्वाधीन त्याचा प्रांत करणें भागच होतें. अर्झा किल्ला व प्रांत राण्याचा राण्याला परत करतेवेळीं भाइंदरचा ठाकूर, ह्मणजे सुक्तावतांचा प्रमुख, ह्मणाला कीं, 'आतां काय राहिलें ? अर्झा किल्ला व प्रांत हेंच आमच्या रक्ताचें मोल होतें. तें आतां ज्या अर्थी आह्मी सोडून राण्याचे स्वाधीन करतों, त्या अर्थी आह्मी आपला सर्व मानमरातबही राण्याचे स्वाधीन करतों !' आपला मानमरातब राण्याचे स्वाधीन करण्यांत त्यांस विशेष वाईट वाटलें असें नाहीं. वरील किल्ला व प्रांत राण्याला परत करतांना सुक्तावतांनीं राण्याकडून इतकें मात्र कबूल करून घेतलें कीं, 'ज्या अर्थी हा किल्ला व प्रांत आह्मीं पुरावतांचे हातून सोडविला आहे त्या अर्थी त्यांना मात्र तो वहिवाटीला देऊं नये. तर तो प्रांत व तो किल्ला आपल्या राजखाल्यांत जुळवून घ्यावा ह्मणजे झालें.' पुढें राण्याचे हवालीं अर्झाचा किल्ला व प्रांत करण्याबद्दलचें जें दस्तक केलें त्या वेळीं, सुक्तावतांतील त्या दोघां भावांनीं राण्याविषयींचा पूर्ण अभिमान धरून व आपण करतों तें त्याचा मान राखण्यासारखेंच करतों आहों असें समजून, मोठ्या गंभीरपणानें त्याजवर सह्या केल्या.

ता० ४ मे १८१८ रोजीं राणा आणि त्याचे इतर सरदार, ठाकूर वगैरेंमध्यें तह झाल्याबद्दल जें वर लिहिलें आहे त्यास मुख्य हरकत आणणारे, उदेपूरच्या राण्याचे पहिल्या प्रतीचे सरदार जे बेदनूर आणि अमाईत येथील ठाकूर; ते होते.

पैकीं बेदनूरचा ठाकूर जैतसिंग हा राठोडकुळांतील मैरटिया नांवाच्या शाखेंतील होता. ही शाखा सर्व रजपूत कुळांमध्यें अत्यंत शूर अशी प्रसिद्ध होती. जैतसिंगाचे पूर्वजांची मूळ भूमि मारवाड असून, तेथून ते, कुंभोराण्याशीं मीराबाईचें लग्न झालें तेव्हां तिच्याबरोबर मेवाडांत आले; ते तेथेंच वसती करून राहिले. ह्या जैतसिंगाचे पुढील वंशजांतच जयमल्ल राठोड झाला. त्याची कीर्ति तर अजरामर आहे. जैतसिंगाचे वंशजांना मेवाडच्या दरबारांत फार मोठा मान होता व त्या मानाला ते जन्मानें आणि कृतीनें पात्रच होते. अशा लोकांशीं राण्याकडून कसें वर्तन रहात होतें हें सांगायला नकोच. जे रजपूत गादीशीं व राजवंशाशीं बेइमान झाले व एकंदर आपल्या कीर्तीला व नांवाला ज्यांनीं कालिमा आणिली त्यांच्यांशीं राण्याचें जसें वर्तन होतें तसेंच या राठोडकुळाशींही त्यानें वर्तन ठेवणें ह्मणजे त्या वंशाचा जाणूनबुजून अपमान करण्यासारखें होतें ह्यांत संशय नाहीं. जैतसिंग हा मोठा मानी आणि निरिच्छ असा होता. राण्याकडून सरदारांकडे असलेल्या फाजील जमिनी, किल्ले वगैरे जेव्हां सोडवून घेण्याचा सपाटा चालला तेव्हां, तसाच प्रसंग आपल्यावरही यावयाचा असें जाणून, जैतसिंग यानें आपण होऊनच राण्याची विनंति केली कीं, 'आपल्याकडील जो मुलूख माझेकडे आहे तो आपले ताब्यांत घेऊन मला ह्या देशांतून जाण्याची परवानगी द्यावी.' जैतसिंगानें राण्याची जी ही विनंति केली ती प्रत्यक्ष राण्याची भेट घेऊन तोंडजबानीच केली; व ही विनंति करण्यास तो राजमहालामध्यें जो उभा राहिला होता तो अशा जागीं उभा होता कीं, राण्याला, त्यास काय तें एक उत्तर मिळाल्याशिवाय त्या महालांतून सुटून जातांच येऊं नये. शेवटीं राण्यानें, हो ना करितां करितां, 'इंग्रजी वकिलाच्या सल्ल्यानें काय तो तुमच्या ह्या विनंतीला जबाब देऊं' असें सांगून, जैतसिंगाला निरोप दिला. फार प्राचीन काळापासून उदेपूरच्या राण्यांचा असा संप्रदाय असे कीं, कोणाही सरदाराच्या खाजगी कामाचे संबंधानें त्याची एकांतीं भेट घ्यावयाची नाहीं. असें करण्यांत, हा मूळ नियम करणाराचा हा हेतु होता कीं, त्या एकांतींच्या बोलण्यांत कदाचित् त्या सरदाराचे मताविरुद्ध राण्याकडून अभिप्राय पडला असतां तो सरदार रागावून राण्याचे जिवावर देखील उठण्याचा संभव होता. आणि, ह्या नियमाप्रमाणें, आजपर्यंत कोणत्याही राण्यानें जैतसिंगाप्रमाणें एकांतीं भेट घेण्याची संधि कोणत्याही सरदारास दिली नव्हती. दरबारच्या मंत्र्यांपैकीं ज्याचें काम हें होतें कीं, कोणकोणत्या सरदाराचा कोणकोणत्या प्रांतावर कसकसा हक्क व अधिकार आहे हें बघून नंतर त्याजवर दरबारचा हक्क व अधिकार पुढें आणावयाचा, त्याप्रमाणें, त्या मंत्र्यानें अनेक कामांत योग्य रीतीचा तपास केला नाहीं, अशी बहुत लोकांची कुरकूर होती. जैतसिंग हा स्वभावतः मोठा

मानी होता हें वर सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें, तो शूरही तसाच होता. त्याला एखाद्या शुष्क कामांत दरबारी लोकांची हांजी हांजी करून किंवा त्यांची मूठ दाबून आपली तरफदारी करण्याकरितां त्यांची मनधरणी करण्याचें बिलकुल आवडत नसे; आणि ह्मणून, त्यानें, आपल्या कामाचे संबंधानें वरील दरबारी मंत्र्यास बारीक रीतीनें व नीटपणें चौकशी करण्याची मुळींच विनंति न करितां, वर लिहिल्याप्रमाणें एकदम राण्याचीच स्वतः भेट घेतली; आणि त्याला आपलें काय ह्मणणें होतें तें कळविलें. जैतसिंग याजकडून जीं दोन शहरें राण्यानें परत मागितलीं होतीं तीं त्याजकडे राणा संग्रामसिंगाच्या कारकीर्दींत देणगीच्या रूपानें गेलीं होतीं. इतकेंच नव्हे, तर त्याचेकडे जी दुसरी जहागिरी नेमणूक होती तिचेबद्दल त्याजकडून सालीना राण्याला १५००० रुपयांची खंडणी मिळत होती. ही सर्व जहागीर व नेमणूक एकदम राण्याचे हवालीं करण्यास त्याची मनापासून खुषी नव्हती. कारण, तो ज्या सुपीक बेदनूर प्रांताचा मालक व वहिवाटदार होता त्या प्रांतांत जैतसिंग ह्याचे ताब्यामध्यें ३६० गांवें व शहरें होतीं. व तीं सर्व त्याचे वंशजांकडे विभागलीं गेलीं होतीं. त्याचप्रमाणें, त्यानें त्या गडबडीच्या वेळीं त्या सर्व प्रांतांवर आपला अधिकार व वजन असें बसविलें होतें कीं, त्यामुळें खुद्द राण्याला त्याचे रयतेकडून जो मान मिळावयाचा तो जैतसिंग ह्याला मिळूं लागला. व त्याचा हुकूम सर्व लोक राजाज्ञेप्रमाणें पाळीत. जैतसिंग याचे ताब्यांतील कित्येक जमिनी तिसऱ्या प्रतीचे लोकांच्या ताब्यांत होत्या. ते लोक पूर्वीं राण्याचे फौजेंतील शूर आणि गाजलेले सरदार होते. तेव्हां, त्यांच्या त्यावेळच्या नौकरीकडे बघितलें असतां व त्यांनीं आपल्या राजाची व देशाची चाकरी वेतन न घेतां ज्या अर्थीं एकनिष्ठपणें केली होती, त्या अर्थीं, त्यांच्याकडे असलेल्या जमिनी व हक्क त्यांचेकडेच कायम राखण्यांत विशेष भूषण होतें. पूर्वीं लष्करच्या मुख्य मुख्य अधिकारी लोकांस पगार, मुशाहिरे, वगैरे नसत. त्यांना सरकारांतून जमिनी, इनामें व जहागिऱ्या वगैरे असत, त्याच त्यांच्या नेमणुका होत. व त्या नेमणुकांचा उपभोग घेऊन त्यांनीं आपल्या राजाची व देशाची एकनिष्ठपणें वंशपरंपरेनें नौकरीचाकरी करावी असा नियम असे. राण्याच्या मागण्या अयोग्य आहेत, व हें दाखविण्यासाठीं नेमणुकीवाल्यांनीं अगोदरपासूनच आपल्याजवळ भरपूर पुरावा जमवून ठेविला होता. त्या संबंधानें बरीच भवतिनभवति झाल्यावर, कबूल व मान्य करण्याचे त्यांचे हक्क आणि त्यांचीं म्हणणीं राण्याच्याही लक्षांत येऊन चुकलीं. कारण, खऱ्या व वास्तविक पुराव्यानें राण्याच्या ह्मणण्याचें वजन किंवा सत्यता बिलकुल न राहून त्या लोकांचेंच ह्मणणें खरें ठरलें. आणि ह्मणून ह्या सरदारानें राण्याकडून ज्या मागण्या आल्या होत्या त्या निखालस नाकबूल करून त्याबद्दल आपल्या स्वतःच्या सहीनें राण्याकडे

लिहून कळविलें. त्यावरून राण्याची तक्रार कांहींएक न चालतां सरदारांचें ह्मणणेंच शेवटीं खरें व निःसंशयाचें ठरलें. पुढें परलोकवासी झालेल्या जयमल्लाचे नांवानें राण्याकडे एक अर्ज करण्यांत आला. हा जयमल्ल ह्मणजे पूर्ण स्वदेशाभिमानी असून, त्यानें अकबरांचे वेळीं फार शौर्यवीर्याचीं कामें केलीं होतीं. या जयमल्लाविषयीं खुद्द अकबर बादशाहाचीही फार पूज्य बुद्धि होती. जयमल्लाचा जात्यभिमान आणि स्वदेशप्रीति त्याचे पूर्वजांपेक्षां फार जाज्वल व प्रखर होती. त्याचे पूर्वज त्याचे सारखे अभिमानी आणि स्वदेशहिततत्पर नव्हते. त्यानें आपल्या कृत्यांनीं शत्रूला सुद्धां थक्क करून टाकलें होतें. स्वदेशहिताकरितां तो वाटेल तें करण्यास मागें पुढें पाहणारा नव्हता. त्याचे नांवाचा व कृत्याचा संदर्भ आणून एक अर्ज वर लिहिल्याप्रमाणें राणाजीकडे पाठविण्यासाठीं तयार करण्यांत आला व तो राण्याकडे पाठविला. त्या अर्जानें एखाद्या जादूगाराप्रमाणें काम केलें. तो अर्ज अशा कांहीं खुबीनें आणि चतुराईनें लिहिला होता कीं, तो पाहून राणाजींच्या डोळ्यांतून खळखळां टिपेंच निघालीं. व राणाजींकडून जें काम करून घेण्याची सरदार लोकांची इच्छा होती तें कामही झालें. त्या अर्जांत असें दर्शविलें होतें कीं, 'बंड झाल्यावेळीं राण्याच्या पक्षाचे जे चार राजनिष्ठ सरदार मरेपर्यंत लढले त्या चौघांत जयमल्ल हा एक असून त्याचे वंशजांस अगदींच विसरून, केवळ लुटारू लोकांना मात्र आपल्याकडून भरपूर आश्रय मिळत आहे, व त्यांना सर्वांपेक्षां वर चढविण्यांत येत आहे.' हें लिहिण्यांतील हेतु इतकाच कीं, भदेश्वरच्या ठाकुरास राण्याचे दरबारांत दिवसेंदिवस बढती मिळत चालली होती. आणि तो तर मागें लुटारू ह्मणून मेवाडांत प्रसिद्ध होता. असो. वरील अर्जानें राण्याला, ज्यांनीं आपल्या देशाकरितां आपले प्राण अर्पण केले त्यांचे वंशजांस विसरूं नये असें वाटूं लागलें, व त्यानें जयमल्लाच्या वंशजाचा मोठा सन्मान केला. ह्याप्रमाणें जयमल्लवंशीय जैतसिंग हा मोठा सन्मान मिळवून बेदनुरास परत गेला. व बेदनूरच्या लोकांनींही जैतसिंगाला जो राण्याकडून मोठा सन्मान मिळाला त्याबद्दलचा आनंदोत्सव केला. हें सर्व वृत्त भदेश्वरचा ठाकूर याला त्याच्या जासुदानें जाऊन सांगितलें. तेव्हां त्याला मात्र फार वाईट वाटलें. राण्यानें जैतसिंगाचा जो मानसन्मान केला तो बरोबर नव्हता, असें त्याला वाटून असमाधान झालें.

भदेश्वरचा ठाकूर हम्मीर हा दुसऱ्या प्रतीचा सरदार असून, तो चोंडावतवंशीय होता. तो आपला बाप सरदारसिंग याचे मागून सरदारीला पावला. सरदारसिंग हा मोठा क्रूरकर्मा होता. त्यानें आपल्या राण्याच्या राजमंदिरांतच त्याचा दिवाण

---

१. मागें पृष्ठें १४४–१४५ पहा.

सोमजी यास ठार मारलें होतें, व त्यामुळें त्या मयत दिवाणाचे दुसरे दोघे भाऊ त्याचा सूड घेण्याची संधि बघत होते. त्या सरदारसिंगाचाच मुलगा हम्मीर. तेव्हां, तो आपल्या बापाच्या सर्व जिंदगीचा जसा मालक झाला तसाच तो त्याच्या औद्धत्य, धिटाई आणि बेमुर्वत या दुर्गुणांचाही वारस बनला. त्या वेळीं राजस्थानांत जे अतिशय दांडगे आणि राजाज्ञा न मानणारे सरदार होते त्यांत हम्मीर हा फार प्रसिद्ध होता. त्याला 'पळपत्या हम्मीर' असें ह्मणत. त्याच्या सरदारीची जहागीर ३०,००० रुपयांपेक्षां जास्त नव्हती; पण, तो तिजपासून ८०,००० रुपयांपर्यंत उत्पन्न करूं लागला. हें उत्पन्न त्यास सुखासमाधानानें होत असे असें मात्र नाहीं. त्या कामांत त्याजकडून आपल्या कुळांवर व वहिवाटदारांवर मोठा जुलूम होत असे. आणि ह्या जुलमाबद्दल त्याला राण्याकडूनही कांहीं ताकींद मिळण्याचें चिन्ह नव्हतें. कारण, तो त्या ताकिदीला मुळींच जुमानणारा नव्हता. लाव्हा येथील सरदाराचे ताब्यांत खैरोदाचा किल्ला व दुसऱ्या कित्येक मोठमोठ्या उत्पन्नांच्या जमिनी होत्या. व खुद्द तो हम्मीर याचे वर्गांतला व त्याच्या वर्तनाचाच होता. हम्मीरावर राण्याचा लोभ फार

१. पृष्ठ ३५६ आणि त्याचे पायथ्याच्या टिपा पहा.

२. एकमेकांचे सूड घेण्याचे संबंधानें ह्या वेळीं मेवाडांत ज्या गोष्टी घडल्या त्यांचें येथें थोडक्यांत पुरें चित्र दाखविलें पाहिजे. उदेपुरास जेव्हां दुष्कीर्तिमान् आणि गैरअब्रूच्या मीरखानाचा प्रतिनिधि जमशीद यानें आपला गोट बसविला तेव्हां त्यानें तेथें रोजच्या रोज नासधूस करण्याचा सपाटा चालविला. त्या वेळीं सरदारसिंग ह्या आपल्या मोठ्या अधिकारावर राण्याचे पदरीं होता. त्याला त्या लुटारूंनीं एकदां आपले गोटांत धरून नेलें. व राण्याकडे ३०,००० रुपये मागितले होते, ते आल्याशिवाय त्याला न सोडण्याचा त्यांनीं निश्चय केला. हें पाहून, सरदारसिंगाकडून मारला गेलेला जो दिवाण सोमजी त्याचे दोघां भावांनीं, आपल्या बंधूचे मारेकऱ्यास 'खरेदी करण्याचें' मनांत आणिलें; व सरदारसिंगाचे कोणी भाईबंद त्याचेसाठीं जमशिदाकडे रुपये भरून त्याची सुटका करण्याचे विचारांत होते तोंच, दिवाण सोमजी याच्या भावांनीं सरदारसिंगाबद्दल जमशीद याजकडे त्याच्या मागणीप्रमाणें ३०,००० रुपये भरून, त्याजकडून त्याला आपले ताब्यांत घेतलें. व पुढें, रामप्यारीचे राजवाड्याच्या महाद्वारावरच त्यांनीं सरदारसिंगाचा शिरच्छेद करून, त्यानें जी आपल्या भावाची गति केली तीच त्याची गत लावून, त्यांनीं आपला सूड उगविला. पुढें एकमेकांचे सूड घेण्याचे निमित्तानें सर्वांचाच एकामागून एक कत्यारीनें नाश झाला. टॉड् ह्मणतो, 'ही गोष्ट मला, दिवाण सोमजीचा वंशज व नातेवाईक स्कलोल ह्मणून माझे वेळेस राण्याचे दिवाणगिरीवर होता, त्यानें सांगितली. ह्या दिवाणाला, तो जरी शूर होता तरी, ह्या लाटालाटीच्या व हिसकाहिसकीच्या प्रसंगीं आपल्यावरही असाच कटारीला बळी पडण्याचा प्रसंग येईल कीं काय, अशी भीति वाटत होती! यामुळें व खुद्द राण्याचे कृतींत व बोलांत प्रमाण नसे यामुळें, दिवाण स्कलोल हा मोठ्या धैर्याचा व शौर्याचा पुरुष होता तरी त्याचें अर्धें धैर्य व शौर्य कमी झालें होतें!'

होता व त्यामुळें तो नेहमीं राजवाड्यांतच रहात असे. हम्मीरानें नेहमीं राण्याचे आज्ञेंत वागतों असें दाखवून त्याची हांजी हांजी करावी. वस्तुतः तो राण्याचा आज्ञाधारक नव्हता. मनास येईल तसें वागणारा होता. परंतु, राण्याचे कानाशीं लागून, त्यानें आपल्यावर त्याचा पूर्ण विश्वास संपादन केला होता. त्यामुळें इतर सरदारांवर त्याचा मोठा वचक बसून, सर्व सरदार हम्मीरास अगदीं वश असत; व त्याचेवर श्रेष्ठ आणि वरचढ असा कोणीच नाहींसारखा झाला होता, अखेरीस लाव्हाचा सुक्तावत सरदार याचे थोर संपत्तीवर व अधिकारावर हम्मीराची नजर जाऊन त्यानें त्याजपासून ती हस्तगत करण्याचा प्रयत्न चालविला. त्याची व राण्याची भेट होण्याचें बंद केलें व होईल तिकडून त्यास त्रास देण्यास सुरुवात केली. शेवटीं, त्याजकडे असलेला खैरोदाचा किल्ला व त्यानें राण्याच्या ज्या जमिनी वगैरे बळकावल्या होत्या त्या सर्व राण्याच्या राण्यास परत केल्या. तेव्हां त्याची व राण्याची दरबारांत गांठ पडूं लागली व त्याचे मागचा हम्मीर याचा त्रास कमी होण्याचा सुमार होता. परंतु, येणेंप्रमाणें त्याला नरम केल्यावर हम्मीराला जास्तच अवसान आल्यासारखें झालें. त्यानें आपल्या मिशांना पीळ भरून शेवटीं राण्याच्या दिवाणाचीही त्याचे पूर्वाधिकाऱ्यासारखीच स्थिति करण्याचें मनांत आणिलें. हम्मीर हा बापासारखाच क्रूरकर्मा होता हें वर सांगितलेंच आहे. त्याच्या दुष्क्रियांचें अनुकरण करणारा त्या वेळीं कोणी नव्हता. तरी, तो जें करी त्याची प्रशंसा करणारे त्या वेळीं पुष्कळ होते. त्याच्या भागांत राहणारे आणि त्याचे आप्तइष्ट हे त्याची फार स्तुति व प्रशंसा करीत. आतां, हम्मीर यास राण्याच्या भीतीविषयीं अथवा प्रीतिविषयीं कांहींच शंका राहिली नाहीं. राण्यावर हम्मीराचें पूर्ण वजन बसलें होतें. मात्र, इंग्रजसरकारच्या एजंटापुढें त्याचें कांहीं चालत नसे. राण्याचा मुलूख ज्यांनीं ज्यांनीं निष्कारण दाबला होता त्यांचे त्यांचेपासून तो परत राण्याचा राण्याला मिळवून देण्याचें काम इंग्रजांच्या एजंटाचे दराऱ्यामुळें ताबडतोब होत असे. त्याप्रमाणें, हम्मीर यानें दाबलेल्या मुलखाचे सोडवणुकीसाठीं त्याजकडे जेव्हां रीतीप्रमाणें राण्याचे कामदार त्याचा हुकूम घेऊन गेले तेव्हां त्यानें त्या कामदारांस मुळींच कांहीं दाद दिली नाहीं. त्यानें राण्याच्या त्या कामदारांचा अपमान करून त्यांना घरांतसुद्धां येऊं दिलें नाहीं. व शेवटीं त्यांस त्यानें तसेंच माघारें लावून दिलें. हम्मीर याच्या ह्या उद्धटपणाबद्दल त्यास ताबडतोब शिक्षा होणें जरूर होतें. राण्याचे अधिकाऱ्यांचा अपमान हम्मीराकडून झाल्याची बातमी जेव्हां राण्याकडे येऊन पोंचली तेव्हां राण्याची स्वारी आपल्या दरबारांत बसली होती. वरील बातमी दरबारांत कळल्याबरोबर एजंटानें राण्याला 'ह्याबद्दलचा विचार करण्यासाठीं वेगळा दरबार भरवावा,' ह्मणून

सांगितलें. दुसरे दिवशीं सूर्यदरवाज्यावरील सज्जांत राण्यानें अमला दरबार भरविला. तेथें एजंटसाहेबही गेले. परंतु ज्याचे संबंधानें विचार करावयाचा होता तो उद्धट हम्मीरही तेथें होता. एजंटसाहेब दरबारांत गेल्यावर राण्याची व त्यांची मुलाखत होऊन परस्पर कुशलप्रश्न झाले. नंतर एजंटानें दिवाणजींना विचारिलें कीं, 'राणाजींच्या ताब्यांत हम्मीराकडचा जो मुलूख खालसात होण्यासाठीं येणार होता तो आला काय?' हम्मीराकडून राण्याचे कामदारांस कोणत्या रीतीनें वागविण्यांत आलें होतें व हम्मीर हा किती धटिंगण होता हें सर्वांस माहित होतेंच. परंतु, त्या संबंधानें दिवाणजींवर जी जबाबदारी होती तींतून ते दूर आहेत असें दाखविण्यासाठीं व दिवाणजींनीं राण्याजवळ हम्मीराचें दांडगेपण सांगितल्यानें त्यांजवर हम्मीर हा विनाकारण द्वेष धरील, तर तसा प्रसंग न यावा ह्मणून, एजंटानें स्वतः राण्यास, त्या जमलेल्या दरबारांत, हम्मीरानें जो उद्धटपणा आणि दांडगाई केली ती सर्व, जशी काय दरबारच्या लोकांना व खुद्द राण्याला ती मुळींच माहित नाहीं, अशा समजुतीनें, खुलासेवार कळविली. व शेवटीं, एजंटानें त्या वेळीं राण्याचे वतीनें दरबारांत हम्मीराला निक्षून सांगितलें कीं, 'ज्या अर्थीं तुह्मीं ह्याप्रमाणें आपल्या राज्यकर्त्या राणाजींचा हुकूम अमान्य केला आहे त्या अर्थीं तुह्मीं ह्यापुढें उदेपुरांत एक क्षणभरही राहतां उपयोगीं नाहीं.' एजंटानें ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर त्याच हुकुमाचा राण्यानेंही मोठ्या जोरानें पुनरुच्चार करून सर्व सभाजनांस कळविलें कीं, 'आह्माला कोणावरही कांहीं बळजबरी करावयाची नाहीं. कोणाघरही जुलूमजबरदस्ती होऊं नये अशी आमची इच्छा आहे. ज्याची त्यांच्याकडे त्याच्या मालकीची जी वास्तविक जिंदगी असेल ती रहावी व आमच्या दौलतीपैकीं, कोणी गैरकायदेशीर अपहार करूं नये. आणि अशी व्यवस्था राहण्यांत जे कोंणी आमचा हुकूम मानणार नाहींत त्यांस आमचे मुख्य मित्र जे एजंटसाहेब त्यांनीं फर्माविलेली शिक्षा देणेंच योग्य आहे.' ह्याप्रमाणें राणाजींनीं भाषण करून दरबारबरखास्तीची सूचना केली. त्याबरोबर विडे वांटण्यास आणिले. राणाजींच्या हातचा प्रत्येक दरबारी मनुष्यानें विडा घेतला व त्याचप्रमाणें शेवटीं हम्मीरही तो विडा घेण्यास राणाजींच्या पुढें आला. तेव्हां त्याला विडा देतांना राणाजींनीं त्याजकडे निष्ठुर मुद्रेनें बघून त्यास सांगितलें कीं, 'तुह्मी आतांच्या आतां येथून राजधानी सोडून चालते व्हा. क्षणभरही येथें राहूं नका.' राणाजींनीं त्याला इतकेंच सांगितलें नाहीं; तर, ते ह्मणाले, 'एजंटसाहेबांनीं तुमचेविषयीं रदबदली केली नसती तर आह्मीं तुह्मांला मेवाड देशांतून घालवून देण्याची शिक्षा दिली असती. परंतु, एजंटसाहेबांच्या शिफारशीवरून मी तुह्माला फक्त राजधानीच्या हद्दपारीची शिक्षा देतों.' ह्याप्रमाणें, हम्मीर यास शिक्षा

देऊन, त्याची सर्व जिंदगी आणि मालमत्ता जप्त करण्याविषयीं हुकूम दिला. त्याच रात्रीं हम्मीर उदेपुरांतून निघून गेला. हम्मीर याचे संबंधानें राण्याला जो विश्वास असून त्याजवर जें त्याचें प्रेम होतें त्यावरून बघतां, त्याजकडून हम्मीर याचेविषयीं इतकें न्यायनिष्ठुरतेचें वर्तन घडेल असें कोणासही वाटलें नव्हतें. हम्मीराची सर्व जिंदगी जप्त करण्यांत आली इतकेंच नव्हे; तर त्या जप्तीचें निशाण, हम्मीराचा जो भदेश्वर येथील किल्ला त्याजवरही लागलें. ह्याप्रमाणें हम्मीराचें उदेपुरांतून समूळ उच्चाटन झालें[1].

येथें दुसरी एक गोष्ट लिहिली पाहिजे. २७ वर्षांपासून, ह्मणजे नवीन राज्यव्यवस्था सुरू झाल्यानंतर ५ वर्षांपासून, आमली नांवाचा किल्ला आणि त्याचे भोंवतालच्या जमिनी वगैरे अमाइत कुटुंबाकडे होत्या. या किल्ल्याचा व जमिनींचा ताबा त्या कुटुंबाकडे सरासरीनें ५० वर्षांपासून होता. अमाइत सरदार हे राण्याच्या मुख्य १६ सरदारांपैकीं होते; व ते जगावत शाखेंतले होते. त्या कुटुंबांतला ह्या वेळचा वंशज फार सद्वर्तनी होता. त्याणें बेदनूरच्या सरदाराप्रमाणेंच उदेपूरच्या गादीवर आपला वारसा सांगितला असता. कारण, प्रताप आणि जयमल्ल हे दोघेही त्या दोन कुळांतले मोठे प्रतिस्पर्धी आणि धर्माकरितां प्राण टाकणारे असे होते. आणि चितोडच्या सिसोदिया कुळांतलें पूर्ववैभव तर लुप्तप्रायच होत चाललें होतें. ह्या प्रसंगीं अमाइतच्या वंशजाला आपला चितोडच्या गादीवरचा हक्कच फक्त सांगून गप्प बसावयाचें नव्हतें. कारण, त्या कुळांतला शौर्यशाली जो प्रताप त्याणें आपल्या देशाचे संरक्षणासाठीं मराठ्यांबरोबर लढत असतां धारातीर्थी आपल्या प्राणाचा बळी दिला होता. व त्यामध्यें त्या वंशाकडे आमलीचा किल्ला गेला होता. हल्लींच्या अमाइत वंशजाचें नांव फत्तेसिंग असें असून, त्याला कित्येक धूर्त अशा त्याच्या आप्तांनीं, चोंडावत पक्षाचें हित व्हावें ह्मणून, पुढें केलें. परंतु त्याचा स्वभाव फार खरमरीत आणि चंचल होता, त्यामुळें त्यांचे हेतु सिद्ध होण्यास तो अनुकूल नव्हता. तो खऱ्या

---

१. टॉड् ह्मणतो, 'ह्याप्रमाणें हम्मीर हा हद्दपार झाल्यावर सुमारें १२ महिन्यांनीं मला निंबहेरा येथें कांहीं कामासाठीं कोठ्यावरून जावें लागलें. हम्मीर ज्या किल्ल्यावर राहत असे तेथें कोठ्याहून घोड्यावरून जाण्यास एक तासाचा रस्ता होता. मी कोठ्यास असतां तेथें तो माझे भेटीसाठीं रात्रीं आला. तेव्हां मीं त्याला दुसरे दिवशीं सकाळीं येण्याविषयीं कळविलें. व त्याप्रमाणें तो दुसरे दिवशीं सकाळीं मजकडे आला. प्रथमतः, रीतीप्रमाणें, मी माझ्या चार स्वारांनिशीं त्याला त्याचे किल्ल्यावरून त्याचें स्वागत करून आणण्यास गेलों. तो सकाळचा फराळ आटोपून मजकडे आला, व आपण माझा थोर मित्र ह्मणून, त्याणें आपली बर्ची हातीं धरून व तिची शपथ घेऊन मला सांगितलें कीं, 'मी तुमचा रजपूत आहें, व ह्या शपथेप्रमाणें मी आज्ञाधारक व राजनिष्ठ राहीन.' पण, मला त्याचेविषयीं संशय वाटला.'

रजपुतांप्रमाणेंच मोठा इमानी व प्रामाणिक होता. त्याच्यानें आपला राग आपल्या ताब्यांत ठेववत नसे. एकदां एजंटसाहेब त्याचेकडे भेटीस गेले. त्या भेटीचा मोठा समारंभ केला होता. त्या वेळीं फत्तेसिंगाचें भान ठिकाणीं नव्हतें. व त्यामुळें त्याच्यानें एजंटाशीं, जितक्या अदबीनें वागायला पाहिजे होतें तितकें वागतां आलें नाहीं. तो जरी एजंटाशीं कांहीं एक फारसें बोलला नाहीं तरी त्याचे डोळे विस्तवासारखे लाल होऊन तो केवळ अमलाच्या तारेंत गुंग असल्यांप्रमाणें त्यानें आपली बेपर्वाई फारच दाखविली. त्याचे पुढें रीतीचें बोलण्याची सोय दिसेना. शेवटीं, बेदनूरच्या ठाकुराप्रमाणेंच एजंटाची मध्यस्थी त्यानें कबूल करून तो आपल्या सरदारांसहवर्तमान दरबारांत एजंटाला भेटण्यासाठीं आला. ह्या भेटीचा परिणाम काय होईल याचें त्यास कांहींच अनुमान नव्हतें. एजंटानें त्यास कानउघाडणीच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या; परंतु त्याचा कांहीं योग्य परिणाम झाला नाहीं. तो कांहीं केल्या बोलेचना. हट्ट व दुराग्रह ह्यांनीं फुगून तो अगदीं मूकस्तंभासारखा एजंटासमोर खुर्चीवर गप्प बसला होता. त्यानें आपल्या समोर गुडघ्यांवर ढाल उभी करून त्या ढालीवर आपले बाहु आणि डोकें ठेवून तो एकसारखा खालीं जमिनीकडेच बघत तटस्थ बसला होता. त्याचें हें मौन अप्रशस्त व त्याचे घराण्याचे रीतीभातींकडे पाहिलें असतां असभ्यतेचें होतें. तें मोडण्यासाठीं एजंटानें त्याला त्याचे घराण्यांतील पुरुषांच्या थोरपणाच्या व सभ्यतेच्या गोष्टी सांगून व त्यांच्या बापाची तसबीर दाखवून त्यास ह्मटलें कीं, 'ह्या सरदारानें स्वामिधर्म व आपल्या वडिलांपासून चालत आलेली राजनिष्ठा ह्यांचें रक्षण करण्यांत जो येवढा लौकिक मिळविला तो तुमच्या ह्या अशा बेपर्वाईच्या वर्तनासारखें वर्तन करून, मिळविला नाहीं.' एजंटाचें हें भाषण ऐकिल्याबरोबर त्याची दृष्टि ठिकाणावर येऊन त्यानें खाड्दिशीं आपले डोळे उघडले. तेव्हां त्या डोळयांत कांहीं शुद्धि असल्याचें दिसलें. त्याचा चेहरा जरा प्रफुल्लित होऊनत्याचे गालांत किंचित् हास्य दिसूं लागलें. तो लागलेंच ह्मणाला, 'ही तसबीर तुह्मांकडे कशी आली ? ही ठेवण्यांत तुह्मांला काय फायदा ?' हें बोलत असतां त्याचे डोळयांस पाणी येऊन तो आणखी ह्मणाला, 'तुह्मी ही दाखवितां ही माझेच बापाची तसबीर, ना ?' एजंटानें उत्तर दिलें, 'होय. ही राजनिष्ठ प्रतापसिंहाचीच तसबीर असून ही ज्या दिवशीं ते मृत्युमुखीं जाऊन पडण्यासाठीं निघाले त्या दिवशीं काढली. ते जरी देहानें गेले तरी त्यांची कीर्ति अजून जीवमान असून त्या कीर्तीला परकी लोक सुद्धां मान देत आहेत !' हें ऐकिल्याबरोबर तो अतिहर्षानें, पण किंचित् खेदयुक्त अशा हलक्या स्वरानें ह्मणाला, 'आमली घ्या ! आमली घ्या ! परंतु जें आह्मीं नुकसान सोसलों तें विसरूं नका.' आतां ही भेट उगाच जास्त वेळ वाढविण्यांत दोघांनाही कांहीं सुख नव्हतें.

व फत्तेसिंग याचे तोंडांतून जे शब्द निघाले ते खरे करून घेण्यास आतां विनाकारण उशीर करण्यांत कांहीं फायदा नव्हता ह्मणून एजंटानें लागलेंच फत्तेसिंगाला आमली किल्ल्याची सोडचिठ्ठी लिहिण्याविषयीं कळविलें.

ह्याप्रमाणें मेवाड देशांत स्वस्थता व सुधारणा करण्याचे वेळीं प्रथमतःच काय काय करावें लागलें व त्या वेळीं त्या प्रांतांत ज्यांचे हातीं कांहीं अधिकार व स्वामित्व होतें त्यांशीं कसें वर्तन ठेवावें लागलें याबद्दल दिग्दर्शन होण्याकरितां हीं कांहीं उदाहरणें सांगितलीं. ह्यापेक्षां ह्याबद्दलचा विशेष तपशील करण्यांत अधिक अर्थ नाहीं. तथापि, ह्या सर्व सुव्यवस्था करण्याचे कामांतील हकीकतीचा शेवट करण्यापूर्वी मेवाडांतील अतिगरीब तरी मोठ्या महत्वाच्या अशा शेतकरीवर्गाची स्थिति ह्या वेळीं कशी काय होती व त्यांचे पूर्वीचे अधिकार, त्यांची भरभराट आणि त्या अधिकारभरभराटीला उतार कसा लागला, याजबद्दलचा खुलासा थोडक्यांत केला पाहिजे. ह्या विषयाच्या संबंधानें जमीदारीपद्धतीची माहिती देतांना विशेष विस्तारानें वर्णन केलें आहे. जमीदारीपद्धतीचे माहितींत जमिनीच्या स्वामित्वाचा व हक्काचा विशेष विचार केला आहे. जमीदारीपद्धतीचे संबंधानें मतभेद आहे. ह्मणून हिंदुस्थानासारख्या विस्तृत देशांत खऱ्या व शुद्ध रीतीची जमीदारीपद्धति जेथें चालू होती तेथला प्रकार कसा काय आहे तो जरा खुलाशानें कळविणें जरूर आहे.

मेवाडांत जमिनीची मालकी रयतेकडे आहे. जमिनीची मालकी ह्मणजे तिकडील रयतेच्या निर्वाहाचें अखंड साधन होय. जो जमिनीचा मालक त्याचे निर्वाहाची कोणत्याही काळीं कोणासही काळजी नको. कसलीही क्रांति होवो; तिकडील जमीदाराला आपल्या निर्वाहाची ह्मणून पंचईत कशी ती पडायाचीच नाहीं. ज्याला जमीनजुमला असतो तो त्या आपल्या स्वामित्वाला बापोता[1] (पूर्वार्जित) असें ह्मणतो. बापोत्याचा ह्मणजे मिराशीचा हक्क हा कांहीं सामान्य नव्हे. बापोता ह्या शब्दांतच रजपुतांचे भाषेंत इतका अर्थ आहे कीं, तो हक्क ह्मणजे अतिशय जुना, अत्यंत अखंड आणि अत्युत्कृष्ट व फार मोठा असा समजला जावा. वडिलोपार्जित आणि आपल्या पक्क्या स्वामित्वाचा असा बापोत्यासारखा थोर व वजनदार हक्क

१. 'बापोता' याचा शब्दशः अर्थ 'बापाचा' ह्मणजे, बापानें मिळविलेला, पूर्वार्जित. रजपूत भाषेंत 'ता' हा प्रत्यय 'त्याजपासून चालत आलेला' इतक्या अर्थाचा वाचक आहे. उदाहरणः— 'करणसोता' ह्मणजे करणसिंग (कर्णसिंह) राजापासून चालत आलेला; 'मानसिंगोता' ह्मणजे मानसिंगापासून चालत आलेला. हा 'ता' किंवा 'टा' प्रत्यय ग्रीस देशांत आल्बेनिया वगैरे डोंगरी मुलखांतील राहणाऱ्या लोकांचे हक्काला देखील चालत आला आहे. तिकडे 'मायनोटा' व रजपुतांतील 'मायरोता' हीं दोन्हीं नांवें अर्थरूपांमध्यें अगदीं सदृश आहेत, व दोन्हींही डोंगरी प्रदेशांत राहणाऱ्या लोकांचे हक्काचींच वाचक आहेत!

राजस्थानांत दुसरा कोणताही समजला जात नाहीं. जो जमिनीची दुरुस्ती व मशागत करील त्याची जमीन; मग तो मोठा राजकुलीन असो किंवा अगदीं लांकूडतोड्या असो. ह्याप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं ज्या ज्या जमिनीच्या दुरुस्त्या व मशागती केल्या त्यांचे त्यांचे वंशांकडे त्या त्या जमिनी चालल्याच पाहिजेत. देशामध्यें कशाही प्रकारचीं भांडणें, तंटे, युद्धें, मारामाऱ्या अथवा राज्यक्रांति होवोत, तिकडील मिरासीचा हक्क व स्वामित्व तेथील रयतेसच आहे. त्यामध्यें कोणीही फेरबदल करूं शकत नाहीं; व त्यामध्यें कोणीही हात घालतां कामा नये. जो राजा असेल त्यानें त्याच्या ठरावाप्रमाणें आपलें सरकारदेणें तेवढें मिरासदारापासून घ्यावें. परंतु जमिनीची मालकी मिरासदाराची आहे. ह्याबद्दल त्यांचेमध्यें अशी ह्मण आहे कीं, 'भोगरा धनी राज हो; भोमरा धनी मा छो.' ह्मणजे, साऱ्याचा धनी राजा आहे; जमिनीचा मालक मी आहें. राजस्थानांतल्या मिरासदारांच्या ह्या हक्काचें रक्षण कोणीही राज्यकर्ता आला तरी त्यानें केलें पाहिजे, इतकेंच नव्हे; तर जो कोणी त्या मुलखावर राज्य करणारा होईल त्यानें ते जमीदार व मिरासदार ज्या देवतांचें पूजन वगैरे करतील व ज्यांस आपले उपाध्याय व गुरु मानून ज्या धर्मग्रंथांचे ते अनुयायी असतील त्या सर्व देवतांचा, गुरूंचा व धर्मग्रंथांचा मान ठेविलाच पाहिजे, असा नियम आहे. ह्या नियमाचें उल्लंघन कोणाही राज्यकर्त्यानें करितां कामा नये. राज्यकर्त्यांनें जे कायदे वगैरे करणें ते देखील त्यांचे धर्मग्रंथांला अनुसरून करावे. त्याप्रमाणें जुन्या पद्धतीला अनुसरून, जमिनीसंबंधी जे काय नियम करणें असतील ते केल्यास कोणत्याही राज्यकर्त्याला त्यामध्यें कोणत्याही प्रकारची अडचण येऊं नये, अशा रीतीनें त्यांची जुनी पद्धति पूर्णत्वाला येऊन पोहोंचली आहे. त्यांचेमध्यें जे जुने कारस्थानी लोक होऊन गेले त्यांनीं वेळोवेळीं जें लिहून ठेविलें आहे तें इतकें पूर्ण आहे कीं, त्याला अनुसरलें ह्मणजे राजस्थानांत राज्यकारभार चालविण्यास कोणतीही अडचण पडत नाहीं. हिंदुधर्मशास्त्रप्रणेता जो मनु त्याच्या नियमांवरही लोकव्यवहारपद्धतीनें राजस्थानांतल्या राजकार्यधुरंधर थोर पुरुषांनीं आपले ठराव निरनिराळ्या वेळीं लिहून ठेविले आहेत. ते सर्व एकत्र केले तर तें एक साधें व पूर्ण असें स्वतंत्र कायद्यांचें पुस्तकच होईल. राजस्थानांत आजपर्यंत अनेक परकीय राजांनीं राज्यें करून रजपुत लोकांचे जुन्या राज्यपद्धतींत वगैरे पुष्कळ फेरफार केले व त्यामुळें कित्येक जुनीं तत्वें आज नाहींशीं झालीं; व जीं कित्येक आहेत त्यांमध्यें बराच कमीजास्तपणा आला आहे; तरी, हल्लीं जो कोणी तिकडील एकंदर राजकारकीर्दीच्या धोरणाचा विचार पाहील त्यास असें आढळून येईल कीं, जे कांहीं फेरफार झाले आहेत त्यांमुळें त्यांच्या मूळाला धक्का न लागतां त्यांची जमीदारी व मिरासपद्धति

वगैरे फार प्राचीन काळापासून आजपर्यंत अव्याहतपणें बहुतकरून जशाच्या तशाच चालत आल्या आहेत. कोठें कोठें भाषाभेदानें व पारिभाषिक व्याख्याभिन्नतेनें जुन्या पद्धतीमध्यें व जुन्या ठरावांत कांहीं कांहीं चुका व अव्यवस्थित भाग दिसेल; परंतु एककाळीं राजस्थानांत मिरासदारीचें मुख्य व प्राथमिक तत्व जें सार्वत्रिक व्यापून राहिलें होतें तें अजूनही इंद्रियगोचर आहे. त्या तत्वाची व्याप्ति इतकी आहे कीं, तुह्मी खानदेश, कर्नाटक अथवा राजस्थान ह्या परस्पर दूरदूरच्या प्रांतांत कोठेंही मिरासदाराची हक्कपद्धति पाहिली तरी, तत्वतः ती सर्वांना एकाच स्वरूपाची दिसेल.

ह्या देशांतील ग्रामव्यवस्था पाहिली तर आरियन् यानें वर्णिलेल्या कालापासून अंशतः प्रजासत्ताक राज्याचे छायेचीच दिसते; व ह्या ग्रामव्यवस्थेंत ग्रामसुधारणा व राज्यकर्तृत्व हे दोन्ही भाग समाविष्ट असलेले दिसतात. ही ग्रामव्यवस्था नीट रीतीनें व सुरळीतपणें चालण्यासाठीं प्रत्येक ग्रामावर कांहीं तरी सरकारदेणें आकारलेलें असे. हिंदु-लोकांचा मुख्य धर्मशास्त्रग्रंथ लिहिणारा जो मनु त्यानें आपल्या ग्रंथांत राजधर्म व राजकर्तव्यें हीं सर्व उत्तम रीतीनें लिहिलेलीं आहेत. व तीं युरोपखंडांतील सुधारलेल्या राजधर्माप्रमाणें व राजकर्तव्याप्रमाणें लिहिलेलीं आहेत. तरी, वर सांगितलेल्या इकडील ग्रामव्यवस्थेनें राजा व प्रजा ह्यांजमधील परस्पर संबंधास व्यत्यय न येतां, दोघांकडेही त्यांच्या त्यांच्या मानानें स्वतंत्र व पूर्ण अधिकार ठेविलेले असून, दोघांच्याही स्वातंत्र्यास कोणत्याही प्रकारचा अडथळा व हरकत येत नाहीं, हा विशेष, ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. जो तो आपल्या उद्योगावर अवलंबून आपला निर्वाह करणारा असल्यामुळें कोणास कोणाशीं कांहीं कर्तव्य नसतें; व ह्यामुळें जरी ग्रामाधिकारी व राज्याधिकारी यांचे हातांत असलेली सत्ता व अंमल दाखविण्याचा प्रसंग येत नाहीं तरी त्यांत त्यांस कोणत्याही प्रकारें कमीपणा येत नाहीं, व कोणीही आपल्या असल्या स्थितीस कंटाळून महत्वाकांक्षाधीन होत नाहीं. हा मोठा स्तुत्य व प्रशंसनीय भाग ह्या देशांतील जुन्या राज्यपद्धतींत दृष्टीस पडतो. आणि येणेंकरून राज्यकर्ते व प्रजाजन यांचेमध्यें परस्पर ऐक्य व प्रीतिसंबंध पाहिजे तसा राहून इतर देशांत जो राजाप्रजांमध्यें असंतोषाचा व खेदोत्पादक बेबनाव दृष्टीस पडतो तसा बेबनाव जुन्या राज्यपद्धतीमुळें मुळींच उत्पन्न होण्याचा संभव नसतो. प्रत्येक संस्थानांत प्रत्येक गांव हा स्वतंत्र असून त्या गांवांतील प्रत्येक मनुष्य आपआपल्या ठिकाणीं आपला मुखत्यार व अधिकारी असतो. त्यांना कायद्याचे ग्रंथ माहीत नसतात, तरी त्यांच्या ग्रामाची व त्यांचे स्वतःची अंतस्थ व्यवस्था ठेवण्यासाठीं स्वतंत्र पोलिस शिपाईही ठेवण्याचें त्यांना कारण पडत नाहीं. ह्यामुळें हल्लींच्या राजकारकीर्दींत असणारीं अनेक खर्चाचीं व व्यापाराचीं खातीं पूर्वींच्या कारभारांत मुळींच दिसत नाहींत. राज्यकर्ता जो

पुरुष असेल त्याला नियमित कर दिला ह्मणजे झालें. जेथें कोठें तंटे बखेडे पडतील तेथें लवादानें व पंचायतीनें निवाडे करून घेत, ह्मणजे सर्व न्यायमनसुबीचा निकाल लागत असे.

परंतु मेवाडचे जमीदार ह्मटले असतां ह्याहूनही विशेष स्वतंत्र असत. त्यांचा आपल्या परंपरेच्या हक्कांकडे विशेष लक्ष्य देऊन असण्याचा शिरस्ता फार बलवत्तर असे. त्यांचा बापोत्याचा हक्क ह्मटला ह्मणजे त्यांचें जीवनसर्वस्व असे. हा बापोत्याचा अधिकार रूपांतरानें हिंदुस्थानद्वीपकल्पांत सर्व ठिकाणीं निरनिराळ्या नांवानें चालू आहे. त्याला वतन किंवा मिरास अशींही निरनिराळीं नांवें आहेत. वतन हा शब्द फारशीभाषेंतला असून तो खानदेश वगैरे भागांत चालतो, आणि मिरास हा अरबी शब्द असून तो कर्नाटक प्रांतांत चालतो. व हे शब्द ह्या देशांत मुसलमान बादशाहाकडून आले आहेत. प्रसिद्ध फारशीभाषेंत नीतिग्रंथ लिहिणारा जो सादी त्यानें एके ठिकाणीं ह्या वतनमिरासीविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "पुत्रानें बापाच्या वतनमिरासीवर आपला वारसा व हक्क दाखविणें हें जितकें कायदेशीर, न्याय्य व यथार्थ आहे, त्याचेपेक्षां, वाडवडिलांचें शहाणपण परंपरेनें आपल्या स्वाधीन ठेवण्याकडे वारसदारानें व हक्कदारानें विशेष धोरण ठेवावें."

बापोत्याचा हक्कदार जर लष्करी सरदार असेल तर त्याला 'भोम्या' असें ह्मणतात. भोम्या ह्मणजे, भूमीचा उपभोग घेणारा वतनदार किंवा मिरासदार या अर्थाचाच वाचक शब्द आहे. कर्नाटकांत अशा मिरासदार लष्करी सरदाराला 'कन्याची' असें ह्मणतात. कन्याची ह्यांत 'कनी' ह्मणजे जमीन आणि 'आची' ह्मणजे हक्कदार असे दोन शब्द मिळून 'कन्याची' हा एक सामासिक शब्द झाला आहे. व ह्यालाच राजस्थानांत 'भोम्या' असें ह्मणतात.

मुसलमान बादशाहीची जेव्हां अगदीं भरभराटीची वेळ होती, तेव्हां त्यांणीं हिंदुलोकांना जमीदार करून एकेका भागाचे त्यांस छोटे छोटे राजे केले. त्या लोकांना ही जमिनदारी देऊन व त्यांस आपल्या हाताखालचे मांडलिक व हुकुमांतले असें समजून, त्यांचा अपमान करण्याचा बादशाहांचा हेतु नव्हता; परंतु उलट त्यांचें भोम्याराज असें सन्मानदायक व श्रेष्ठतादर्शक नांव यथार्थ व्हावें अशी त्यांची इच्छा असे. आणि तेणेंकरून त्यांच्या पूर्वापर हक्कदारीला विशेष दार्ढ्य आलें. तसेंच, तेणेंकरून त्या देशांतील भूमीचे खरे मालक कोण हेंही समजून येण्यास अडचण पडत नाहीं; व पूर्वीचा इतिहास व प्रस्तुतची वहिवाट कशी काय आहे त्याचेंही ज्ञान होतें. राजाकडून इनाम मिळवून इनामदार होऊन राहण्यापेक्षां राजस्थानांतले मूळचे जे भोम्ये ह्मणजे शेतकरी वगैरे जमिनीचे मालक आहेत, त्यांजकडून त्या जमिनीचे हक्क आपल्याकडे घेणें ह्यांत जास्त योग्यता आहे असें तिकडे समजतात.

सारांश, राजस्थानांत राज्यकर्त्यांपेक्षां रयतेच्याच हक्कवारशास जास्त मान आणि थोरपणा आहे. राजाच्या पदरचे सरदार वगैरे राजसेवा स्वीकारून मिळवितात काय? तर, यावच्चंद्रदिवाकरौ टिकणारा असा भोम्येपणाचा हक्क आपल्याला कोणीकडून आणि कसेंही करून तरी संपादन होईल असा यत्न ते नेहमीं करीत असतात, व आपण रयतेंत मिसळण्याची तजवीज बघत असतात. कांहीं थोडे बिघे जमीन आपल्या स्वामित्वाची खरीद करून ठेविली ह्मणजे त्या मनुष्याला आपल्या कायमपणाचा विश्वास येतो. प्रसंगविशेषीं राजाची इतराजी होऊन त्याचे पदरची सरदारी आणि सरदारीच्या संबंधाचें उत्पन्न बंद झालें तरी, त्यानें वर लिहिल्याप्रमाणें संपादन केलेल्या भोम्येपणावरच तो खुष राहून निर्वाह करितो. यावरून, राजकृपेपेक्षां रयतेकडून मिळविलेल्या भोम्येपणाच्या हक्काची वजनदारी किती आहे याचें अनुमान सहज होईल. राजाची अवकृपा झाली अथवा वयोमानानुरूप राजसेवा करण्याचें सामर्थ्य न उरून नौकरी सुटली तरी, त्याच्यानें त्या सरदाराचा भोम्येपणाचा हक्क त्याजपासून घेववत नाहीं. व त्या सरदारासही आपल्याला ठाकूर किंवा राजाश्रित ह्मणवून घेण्यांत फारसें महत्व वाटत नाहीं. असें आहे तथापि, गलठास ह्मणून राजस्थानच्या कुळवारीमध्यें एक खातें आहे, त्या खात्यांत जर ती भोम्येपणाची जमीन जात असली तर हा नवीन भोम्येपणाचा अधिकार विकत घेणारास, त्याच्या पहिल्या मालकाचेच सर्व हक्क मिळत नाहींत. इतका अधिकार राज्यकर्त्यांकडे असतो.

भोम्येपणाचा हक्क व तो राखण्याबद्दल रयतेला जें स्वातंत्र्य आहे त्यावरून त्यांच्या मूलस्थितीचें परिज्ञान चांगलें होतें. भोम्या यानें आपल्या इच्छेस वाटेल तर स्वतः नांगर चालवून शेती करावी. त्याच्या भूमीचें सरकारांतून मोजमाप व्हावयाचें नाहीं; व कधीं त्यावर सरकारदेणें आकारलें जावयाचें नाहीं. त्याच्या प्रजाधर्माची खूण ह्मणून इतकीच कीं, त्याला साऱ्याची माफी मिळावयाची; मात्र लढाईसंबंधानें होणाऱ्या खर्चाची फेड करण्यासाठीं तीन तीन वर्षांनीं भोम्यांजवळून कांहीं आकार वसूल करण्यांत येतो. अथवा, त्यांनीं लढाईच्या वेळीं राजाची फुकट नौकरी करावी असा ठराव आहे. ह्मणजे, राज्यकर्त्यांस अप्रत्यक्ष रीतीनें ह्या स्वतंत्र रयतेच्या नौकरीचा फायदा मिळतो. राजस्थानांत खातेपिते असे शेतीवाडी करून राहणारे असे भोम्ये हेच वतनदार रयत होत. व कुमळनेर आणि मंडलगड ह्या प्रांतांतल्या लोकांप्रमाणेंच हे भोम्ये आपल्या गांवचे लष्करही आहेत. जेव्हांपासून राजस्थानांत सर्वत्र शांतता झाली व शहरांना स्वतंत्र संरक्षणाची जरूरी वाटेनाशी झाली तेव्हांपासून मेवाडांतल्या भोम्यांशीं असा ठराव करून टाकला आहे कीं, त्यांनीं अल्प मुशाहिरा घेऊन राज्यसंरक्षणार्थ सरहद्दीवर शिपाईगिरीची थोडथोडी नौकरी केली पाहिजे.

ह्याप्रमाणें शेतकरी प्रजेलाच तेवढें राजाकडून जें हंकस्वातंत्र्य मिळतें तें सांगितलें. राण्याच्या मनांत आलें तर तो बेदनूर किंवा साळुंब्रा येथील ठाकुरांपासून त्यांचा अधिकार काढून घेऊं शकेल. परंतु त्याच्यानें परंपरेनें व अत्यंत स्वतंत्रतेनें चालत आलेला जो भोम्येपणाचा हक्क तो काढून घेववत नाहीं. आणि ह्याप्रमाणें, जो ठाकूर कांहीं वर्षोंपूर्वी शंभर स्वारांचा मुख्य ह्मणून राजाच्या बरोबरीनें चालणारा सरदार होता, त्याचे मुलगे भोम्ये होऊन, खुशाल सुखवस्तु ह्मणून राहतात व राजाच्या ठरावाप्रमाणें शिवबंदीखात्यांत आपलीं नांवें दाखल करून आपापल्या गांवीं कालक्षेप करितात. ह्याप्रमाणें, हजारों सरदारवंशीय पुरुष भोम्ये होऊन राहिले आहेत. कनावत, लूनावत, कुंभावत आणि इतर सरदारवंशीय हे आपण थोर सरदारकुलांत जन्मलों येवढेंच स्मरतात असें नाहीं; तर आपण राजाच्या १९ व्या किंवा १३ व्या हिश्शानें राज्याचे मालक आहोंत असें सांगत असतात. इतका त्यांचा भोम्येपणानें राज्यकर्त्याशीं जवळचा संबंध पोंचतो. खुद्द चक्रवर्ती राजे सुद्धां हा भोम्येपणाचा अधिकार रयतेपासून खरीदी करितात. ह्याला उदाहरण चंद भाटाच्या ग्रंथांत सांपडतें. पृथ्वीराज चव्हाण यानें सोळंखी राजापासून जेव्हां अन्हिलवाड्याचें राज्य काबीज केलें तेव्हां त्या राजाचे पुतण्याला पृथ्वीराज चव्हाण यानें त्या वंशाकडे चालू असलेला त्याचा भोम्येपणाचा सर्व हक्क व वारसा कायम ठेवून, त्या संबंधाचे कांहीं प्रांत व बंदरें वगैरे परत केलीं. सारांश, भोम्ये होऊन देशांतले महाजन बनण्यांत जें महत्व व मोठेपण असतें त्याविषयीं प्रत्येक रजपुताला मोठा अभिमान असतो. आणि अशा महाजनकुलीन लोकांकडून जें राज्य चालतें त्यापेक्षां व्यापारी धंद्यानें चालणारें राज्य अगदीं कमी योग्यतेचें असें समजून ते तसल्या राज्याचा तिरस्कार करितात. आमचें राज्य आह्मां स्थाईक लोकांचें आहे, वाणगटांसारख्या उपऱ्या लोकांचें नाहीं; असें ह्मणण्यांत त्यांना एक प्रकारचा मोठा अभिमान वाटतो. जयपूरच्या राज्याविषयीं रजपूत लोकांचें चांगलें मत नाहीं. कारण, ते ह्मणतात, तें महाकुलीन लोकांच्या वस्तीचें राज्य नाहीं; तें सर्व वाणगट भाईंचें—व्यापार धंदेवाल्या लोकांचें—राज्य आहे. तेथें संपत्तीचा सांठा मात्र पुष्कळ होतो; परंतु तेथले मूळचे रहिवासी लोक भिकेला पोंचतात; हें कांहीं खऱ्या राज्याचें लक्षण नव्हे.

मेवाडांतील फर्मान्यांची दरबारी नोंद पाहिली असतां तींत मोठमोठ्या सरदार लोकांच्या भोम्येपणाचे हक्क नोंदलेले आढळतात. हे हक्क त्यांचेकडे कसे आले ह्याबद्दलचा खुलासा होत नाहीं. मूळच्या भोम्यांनीं आपले हक्क सोडून दिल्यामुळें ह्या सरदारांकडे तो भोम्येपणा आला अथवा लोकांनींच त्या सरदारांच्या शूरपणाचे कृत्यांबद्दल त्यांजवर खुष होऊन त्यांस आपल्या भोम्येपणाचे हक्क बक्षिस दिले, ह्या-

पैकीं कोणत्या रीतीनें ते त्यांचेकडे आले असतील तें असोत. त्यांच्या भोम्येपणाचे हक्कास 'भोमरखवाली' असें नांव आहे. ह्मणजे, जमिनीचें रक्षण व्हावें एवढ्याच साठीं हा भोम्येपणा त्यांजकडे दिला आहे असें दिसतें. विशेष चमत्काराची गोष्ट ही आहे कीं, खुद्द राज्यकर्त्याचा देखील भोमरखवालीचा हक्क ह्मणून प्रत्येक खेडेगांवांत सुद्धां असतो. ह्मणजे, ज्याचें राज्य त्याचा सुद्धां भोम्येपणाचा एक स्वतंत्र व इतर रहिवाशांबरोबरीचा हक्क राखण्यांत त्यांस अभिमान वाटतो. प्रत्येक ३०।४० गांवांच्या प्रांतांतून निदान दहाहजारांचें तरी राज्यकर्त्याला ह्या भोमरखवालीच्या हक्काचें उत्पन्न होतें. राज्यकर्त्याला असले किरकोळ रयतेच्या बरोबरीचे व शेतकऱ्याचे हक्क असणें, ते ठेवण्यांत राज्यकर्त्याला अभिमान वाटणें, आणि रयतेनें ते राजाचे हक्क मान्य करणें, ह्या सर्व गोष्टी यद्यपि चमत्कारिक आहेत, तथापि त्या परंपरेनें अविच्छिन्न चालत आल्या आहेत ही गोष्ट खरी. ह्या विलक्षण पद्धतीचें मूळ शोधण्याचा यत्न करणें व्यर्थ आहे. कारण, त्याचें मूळ, लोकांमध्यें चालू असलेल्या जुन्यापुराण्या दंतकथांवरून खात्रीलायक असें समजत नाहीं.

भोम्येपणाच्या हक्काचें महत्व व अभिमान रजपूत लोकांमध्यें किती होता याचीं कांहीं ऐतिहासिक उदाहरणें देऊन, मेवाड प्रांतांतल्या रयतेच्या जमीनसंबंधी स्वामित्वाचे व मिराशीचे हक्कवारशाची हल्लींही तीच स्थिति कायम आहे येवढें सांगून, हा विषय पुरा करतों. मागें एकदां मेवाडच्या राण्याचा विवाह मारवाडांतील त्या वेळची राजधानी मंदोड येथील राजकन्येशीं होण्याचें ठरलें. तिकडे अशी रीति आहे कीं, लग्नाचे वेळीं वधूवरांचे हात एकमेकांनीं धरण्यांचे वेळीं वरानें आपल्या सासऱ्याजवळ आपली जी इच्छा असेल ती कळवावी, व सासऱ्यानें ती जांवयाची इच्छा पुरवावी. ह्या रीतीच्या विलक्षणपणावरून असेही प्रसंग येऊन गुजरल्याचीं उदाहरणें आहेत कीं, त्यामुळें उभयपक्षांमध्यें अत्यंत वितुष्टें व अनर्थ गुजरले आहेत. वरील विवाहप्रसंगीं राण्यानें आपल्या सासऱ्याजवळ आपली अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, दहाहजार जाट शेतकऱ्यांनीं आमच्या मेवाडप्रांतांतील ओसाड जमिनीवर वस्ती करून वसाहत बनवावी. आणि ह्या अपूर्व इच्छेची तृप्ति करून देण्याचें मंदोडच्या राजानेंही कबूल करून, त्याप्रमाणें त्यानें आपल्या जाट प्रजेंतील दहाहजार लोकांस, राण्याचे इच्छेनुरूप, त्याचा ओसाड प्रदेश वसाहत करून सोडण्याचा हुकूम दिला. परंतु लोकांनीं राजाचा तो हुकूम मान्य केला नाहीं; व आपला देश सोडून दुसऱ्या देशांत जाऊन वस्ती करण्याचें सर्वांशीं नाकबूल केलें. ते ह्मणाले, 'आह्मीं आमचा वंशपरंपरेचा बापोत्याचा हक्क सोडून व आमचीं मुलेंबाळें उपाशीं मारून परक्याबरोबर परदेशांत जाऊन रहावें आणि तेथें त्याचेसाठीं मेहनत घ्यावी, ह्याची आ-

झाला काय जरूर आहे ? महाराजांनीं पाहिजे तर आह्मां सर्वांना ठार मारावें; परंतु आह्मी आपला वाडवडिलांचा मुलूख व हक्कवारसा सोडून देऊन परमुलखांत कधींही वस्ती करण्यास जाणार नाहीं.' इतक्या निकराचें उत्तर मंदोडच्या राजानें ऐकल्यावर त्यानें आपल्या राजनिष्ठ रयतेला असा प्रश्न केला कीं, 'मी तर वचन देऊन चुकलों; पण तें पूर्ण करणें तुह्मां सर्वांच्या स्वाधीन असल्यामुळें, तें मोडल्याचा जो दोष माझे माथीं येणार आहे त्यांतून माझी सुटका करा.' इतका भार राजानें आपल्यावर टाकल्यानंतर त्या लोकांनीं त्याचें ह्मणणें कबूल करून, त्याचे आज्ञेप्रमाणें राण्याचे मुलखांत जाऊन वस्ती केली. तथापि, त्यांनीं मारवाडांतील आपले हक्क सोडून दिले नाहींत. राण्यानें, जो प्रदेश ओसाड पडला होता तो सर्व त्यांचे पूर्ण वारशानें व स्वामित्वानें ह्या नवीन वसाहतदारांचे स्वाधीन केला; व त्यांस त्या वसाहत केलेल्या भागामध्यें आपल्या बरोबरीचें हक्कस्वातंत्र्य दिलें. ह्याप्रमाणें, ते मेवाडप्रांतांत कायमचे व स्थाईक झाल्यावर मारवाडांतील त्यांच्या वडिलोपार्जित जिंदगीचाही ताबा ते धरून बसलेच. तो इतका कीं, ते आपल्या ताब्यांतील माळजमिनीवर रजवाड्यांना बागा वगैरे करण्यासही जागा देईनात. हल्लीं त्यांचे वंशज जाट आपल्या त्या मारवाडांतल्या जमिनी बेरीस आणि बनास ह्या नद्यांच्या पाटांनीं भिजवून त्यांचें उत्पन्न खुशाल उपभोगीत आहेत. ह्याप्रमाणें त्यांचा दुप्पट फायदा झाला.

त्या प्रांतांत ह्या नवीन पद्धतीनें व फिरवाफिरवीनें रयतेच्या मालकीचा हक्क विशेष दृढ झाला. त्यांत जिहाजपूर प्रांत विस्तृत आणि दाट लोकवस्तीचा असून, त्यामध्यें १०६ गांवें फार चांगलीं आहेत. ह्या सर्व प्रांतांत दोन भाग केलेले आहेत. आणि हा सर्व राण्याचा मुलूख आहे. हा प्रदेश पूर्वीं कोट्याचा झालिमसिंग याचे ताब्यांत होता, व तो त्याचे जवळून जबरदस्तीनें राण्याकडून हिसकून घेण्यांत आला होता. परंतु, पुढें राण्याचा जो सुभेदार त्या भागावर काम करण्यास नेमिला होता त्यानें सारासारविचार करून त्यावर राण्याचा भोम्येपणाचा हक्क ठेवून तो सर्व प्रदेश तेथील लोकांचे ताब्यांत दिला. व तेथें लोहारियो आणि इतौंडा ह्या नांवांचे दोन तलाव खोदून लोकांकडून जमिनी लागवडीस आणिल्या. यावरून भोम्येपणाच्या हक्काचे संबंधानें बरीच कल्पना वाचकांस होईल. कोट्याच्या रयतेचे मूळच्या हक्कांचा मागमूसही आतां राहिला नाहीं.[१]

---

१. ह्या प्रांतांतील कोट्याचे लोकांचा बापोत्याचा हक्क त्यांचा त्यांना परत देण्याचें ह्या ग्रंथाचा कर्ता कर्नल टॉड् याचे हातांत होतें; परंतु तसें त्याच्याकडून झालें नाहीं, ह्याबद्दल त्यानें आपल्या ग्रंथांत खेद दर्शविला आहे. कर्नल टॉड् ह्मणतो, 'असा चांगला योग आला असतां, माझे अज्ञानामुळें आणि लोकांच्या भलभलत्या समजाविण्यामुळें मला तें सत्कार्य करितां आलें नाहीं. एक तर,

ह्यावरून एकाकडून दुसऱ्याकडे स्वामित्व आणण्याचा त्या वेळीं कसा काय प्रकार होता व अधिकाऱ्यांची सत्ता कशी चालत असे हें समजण्यासारखें आहे. मूळच्या शेतकरी लोकांच्या मालकीचे हक्कांच्या संबंधानें आतां अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

मेवाडांतही इतर ठिकाणच्याप्रमाणेंच, मूळचे मालकीचे हक्क तेथील लोकांकडून काढून दुसऱ्याकडे देण्याची रीति जारीनें चालू होती. हे हक्क चकचकीत विकून फरोक्त करण्यांत येत, अथवा गहाणाचे रूपानें दुसऱ्यांकडे जात. ह्याबद्दलचीं अनेक उदाहरणें देतां येतील; व त्यांत दुसऱ्या प्रकारचीं ह्मणजे गहाणाचे संबंधानें दुसऱ्याकडे हक्क गेल्याचीं उदाहरणें पुष्कळ सांगतां येतील. होर्ली येथील सर्व पिकाऊ जमीन आणि खारीनदीच्या कांठचा सर्व भाग हा बहुतकरून गहाण पडला होता व त्या संबंधाचे जे कागदपत्र झाले आहेत त्यांच्या नोंदीचीं दोन मोठालीं पुस्तकें झालीं आहेत. ह्या नोंदणीच्या पुस्तकांत दस्तऐवज व खतेंपत्रें करावयाच्या पद्धतींतील अनेक प्रकार व तऱ्हा समजून येतात. एकेक गहाणखत १०१ वर्षांच्या मुदतीचें असे.[1] आणि त्या मुदतीनंतर पैसे भरून गहाण माल सोडवून ध्यावयाचा. त्यास व्याज अथवा नफा यांची कांहीं एक अट नसावयाची. मुद्दल देणें मात्र सावकाराजवळ पावतें करावें ह्मणजे झालें, अशी रीति होती. त्यांत एवढी मात्र बोली असे कीं, गहाणदाराकडे जमीन गहाण लावून दिली असली ह्मणजे ती त्याची गहाणाची असेपर्यंत तिचे उत्पन्नांतील चौथा किंवा पांचवा हिस्सा किंवा त्याहूनही थोडा भाग त्याला द्यावयाचा असा करार केलेला असे. ह्या थोड्या भागाला 'घुगऱ्या' ह्मणत असत. तो हिस्सा किंवा त्या थोड्यांशा 'घुगऱ्या' देण्याचा हेतु इतकाच असे कीं, तेणेंकरून गहाण घेणाराचे स्वामित्वाचा हक्क राखला जावा. या देण्याला 'स्वामीभोग' असें ह्मणत असत. हे गहाण घेणारे सावकार बहुतकरून व्यापारी लोक असत. व ते देशाचे सरहद्दीवरच्या शहरांत राहणारे असत. कित्येक गहाणप्रकरणांत तर जमिनीचा मालक,

---

त्या प्रांताची मूळची खरी हकीकत काय होती ती मला पहिल्यानें कळली नाहीं; आणि दुसरें असें कीं, खरे हक्कदार मेले असून, मला असें कळविण्यांत आलें कीं, राण्याचा जिहाजपूर प्रांतावर जो सदाराम सुभेदार होता त्यानें लांच खाऊन जमिनी विकल्या आहेत. परंतु ही गोष्ट अगदीं खोटी होती. त्यानें लांच वगैरे खाऊन जमिनी विकल्या अथवा फरोक्त केल्या नव्हत्या. तर त्याचे सारासारविचाराप्रमाणेंच त्याणें वर लिहिलेली व्यवथा केली होती, असेंही मला पुढें कळून आलें.'

१. बापोल्याचा हक्क जरी फरोक्त करण्यांत येत नसे तरी तो १०१ वर्षें पाळण्यांत येत असे. व तितक्या मुदतीपर्यंत त्या गहाण घेणाराचा ताबाही त्या गहाणावर कायमचा असे. खानदेशांतली मिराशीची रीति अशीच आहे. (मि० एल्फिन्स्टनूचा रिपोर्ट पहा.)

आपल्या पूर्वींच्या पांचचार पिढ्यांपासून जरी आपल्या जमिनी गहाण पडल्या असल्या तरी, त्यांचा तो वहिवाटदार असतो व त्यामुळें त्या जमिनींवरचा आपल्या स्वामित्वाचा हक्क बुडाला असें तो समजत नाहीं. गहाणदारांस त्यांचे सावकारांपासून सोडवून त्यांना सुस्थितीमध्यें आणावें असा विचार निघून कांहीं रक्कम जमविण्यांत आली होती. कारण, गहाणदारीनें जमिनीच्या उत्पन्नास बराच धोका बसत असे. बापोत्याचा हक्क कोणत्याही काळीं रद्द होणारा नसल्यामुळें, जमिनीचा मालक ठिकाणीं असो किंवा नसो, त्याचा हक्क परंपरेनें त्याचे वंशाकडे राहिलाच पाहिजे. आणि यामुळें सावकाराकडून त्या गहाण जमिनीची मशागत रहावी तशी राहण्याचा संभव नसे. सारांश, जमिनी गहाण पडल्यामुळें मालक उदासीन असावयाचे, व मालकाचाच हक्क त्यांजवर असल्यामुळें आपण त्या जमिनीवर उगाच मेहनत करून आपल्याला फायदा काय ? अशा समजुतीमुळें सावकार उदासीन असावयाचे. अशा दोन कारणांनीं गहाण जमिनी नापीक होऊन पडत व त्यांजपासून कोणत्याही प्रकारचें उत्पन्न होत नसे.

हिंदुस्थानामध्यें जाट मुलखांत व इतर सर्व ठिकाणीं जमिनीचे हक्कांविषयींचा निर्बंध इतका कडक असल्यामुळें, कोणीही इतर मोठमोठीं बक्षिसें व द्रव्य मिळविण्यापेक्षां जमीन मिळविण्याविषयीं विशेष उत्सुक असतो. कारण, जमिनीच्या उत्पन्नासारखें कायमचें उत्पन्न दुसरें कोणतेंही नाहीं, अशीं सर्व लोकांची खात्री असते. आजन्म श्रम करून व जीवाविशेष कष्ट व संकटें सोसून जमिनी मिळवून ठेवण्याकडे सर्वांचा व त्यांतही जाट व रजपूत लोकांचा विशेष यत्न असतो. बापानें मोठमोठीं रणें झुंजून मिळवावयाचें काय ? तर, जमिनी. कीं, त्या जमिनींचें उत्पन्न आपल्या पुत्रपौत्रांनीं वंशपरंपरेनें अविच्छिन्न उपभोगावें.

गांवचे अधिकारी पाटील यांची माहिती वाचकांस आहेच. पाटीलकीचा अधिकार ह्मणजे हिंदुस्थानांत फार जुना व वजनदारीचा मानलेला आहे. पाटलाला सर्व

---

१. मनूनें, जमिनीच्या मालकांचे हक्क फार सक्त रीतीनें पाळले पाहिजेत असें लिहिलें आहे. 'जमिनीचा मालक आणि तिजमध्यें पेरणी करणारा यांचेमध्यें तसाच कांहीं विशेष करार झाल्याशिवाय पेरणी करणाराला कांहींएक मिळूं नये. त्या सर्व पिकाचा मालक जमिनीचा धनीच आहे. इतकेंच नव्हे, तर वाऱ्यानें उडून किंवा पाण्यानें वाहून धान्यबीज जमिनींत पडलें व त्याचें पीक आलें तरी देखील जमिनीचा मालकच, त्या पिकाचा व वृक्षवनस्पत्यादींचा धनी होय.' (पहा दास्याध्याय–श्लोक ५२-५४ ) जमिनीच्या मालकाकडून कसल्याही प्रकारचा अपराध घडला असला व न्यायशास्त्राप्रमाणें त्या मालकाला देहांताची जरी शिक्षा झाली असली तरी त्यांचे वंशाचा त्याचे जमिनीवरचा हक्क व स्वामित्व रद्द होत नाहीं.

गांवचे लोक ओळखतात. आणि संन्याशी व फकीरसुद्धां पाटलाचा अधिकार समजून असतात. पाटील हा गांवचा संरक्षकच होय. त्याला आपल्या अधिकाराचे भोगवट्याबद्दल आपल्या राजाला कांहींएक द्यावें लागत नाहीं. त्याजकडे त्याच्या वतनाच्या जमिनी बिनहरकत राहून त्यांचा उपभोग परंपरेनें त्याचे वंशजांनीं अविच्छिन्नपणें व सतत घ्यावा, असे त्यास लेख मिळालेले असतात. गांवच्या पाटलाला सरकारदेणें ह्मणून कांहीं द्यावें लागत नाहीं ही गोष्ट खरी; तरी त्यास प्रति तीन वर्षांनीं थोडेंसें सरकारदेणें द्यावें लागतें. व हें देणें आपल्या सरकाराला लढाई वगैरे करण्यास जो खर्च येतो तो खर्च निभविण्यासाठीं ह्मणून त्याजकडून सरकार घेतें.

पाटीलकीच्या वतनाचे संबंधानें अनेकांचीं अनेक मतें आहेत. पाटील हा जरी फार महत्वाचा व सर्वांच्या माहितीचा मनुष्य आहे तरी, या मनुष्याचें येवढें महत्व कोणत्या काळापासून वाढलें आहे याचें मूळ पाहण्यास गेलें असतां, हा पाटिलकीचा अधिकार व हुद्दा हिंदु लोकांतला नाहीं, असें कळतें. 'पाटील' हा शब्द देखील हिंदु लोकांतला नाहीं. तथापि, पाटिलकीचा अधिकार व हुद्दा हा ह्या देशांत फार प्राचीन काळापासून चालत आला आहे. आणि 'पाटील' या नांवाची व्युत्पत्ति बघितली तर त्याचा अर्थ देखील 'समाजाचा मुख्य' असा होतो.

मेवाडांतली पाटिलकी मूळची निवडणुकीची होती. तिकडे पाटील ह्मणजे सरकार आणि गांवढेकरी यांची वकिली करणारा मनुष्य होय. सरकारचें ह्मणणें काय आहे हें गांवढेकऱ्यांस समजून सांगायचें, व गांवढेकऱ्यांचें ह्मणणें काय असेल तें सरकाराला कळवावयाचें, असें काम पाटलाकडे सोंपवलेलें असे. अर्थात् पाटील ह्मणजे राजा व प्रजा यांचा मध्यस्थ होय. मेवाडच्या पाटलाला बापोत्याचा हक्क असून, एकंदर गांवाचें जें उत्पन्न होईल त्याचा चाळिसावा भाग पाटलाचे मालकीचा समजावा अशी वहिवाट आहे. आणि तो आपल्या वतनी जमिनींशिवाय आणखी जमिनी घेऊन जर त्यांची लागवड करील तर त्यास त्या जमिनीचे सरकारच्या ठराविक साऱ्यांतून तिसरा किंवा चवथा भाग माफ केलेला असे. ह्याप्रमाणें, सरकार आणि रयत

---

१. जुन्या उज्जनी नगरांत कांहीं जुने ताम्रपट उकरून काढण्यांत आलेले रॉयल् एशियाटिक् सोसायटीकडे संग्रहास आहेत. हे ताम्रपट ह्मणजे त्या काळच्या राजांकडील इनामें वतनें दिल्याबद्दलच्या सनदा किंवा लेख होत. व ह्या ताम्रपटांत 'पट्टाकील व प्रजा' यांचे नांवानें गांव दिल्याबद्दल लिहिलें आहे. 'पट्टा' ह्मणजे देणगी, आणि 'कील' ह्मणजे खिळा, असा त्या वेळच्या भाषेंतल्या शब्दांवरून अर्थ निघतो. अर्थात् खिळे मारून पक्की केलेली देणगी असा 'पट्टा-कील' या शब्दाचा भावार्थ असूंन त्यावरूनच 'पाटील' किंवा 'पाटिलकी' हा अपभ्रष्ट शब्द झाला असावा, असा अजमास आहे.

ह्या दोहोंचा जोड करणारा व साधनीभूत असा पाटील हा एक अधिकारी असे. मेवाडांतल्या पाटलाचे वर सांगितलेले हक्क व दस्तूर पूर्वी चालू होते. परंतु ते हक्क व दस्तूर पुढें ज्या लुटालुटीच्या लढाया आणि दंगेधोपे झाले त्यांत सर्व मोडले गेले. तरी, जशी लुटालूट वाढत चालली तसा पाटलांनीं आपला अधिकारही मूळच्या ठरावापेक्षां पुष्कळच वाढविला. पुढें पाटील ह्मणजे गांवच्या रयतेचा कुलमुखत्यारच बनून त्याचे गांवावर जी खंडणी बसेल ती वसूल करून त्यांची भरपाई करणारा असा तो जबाबदार अधिकारीच झाला. आणि लुटारू लोकांनींही आपली खंडणी वसूल होईपर्यंत गांवच्या पाटलासच ओलीस ठेवण्याचा क्रम चालविला. लुटारू लोकांनीं पाटलाला आपल्या गोटांत ओलीस ठेविला ह्मणजे त्यानेंही आपल्या गांवच्या लोकांसाठीं, त्यांजकडून खंडणीची भरती होईपर्यंत शत्रूंच्या ताब्यांत रहावें; व ह्या नेहमीं स्वाऱ्या करणाऱ्या लुटारू लोकांच्या खंडण्यांची भरपाई करण्याचें काम आनंदानें पतकरावें. हें किंवा अशा प्रकारचीं रयतेच्या संबंधाचीं जबाबदारीचीं कामें करण्यांतच पाटलाला आपल्या अधिकाराचा गौरव वाटत असे. आपल्या गांवावर वारंवार पेंढाऱ्यांच्या स्वाऱ्या येऊन त्यांस खंडण्या द्याव्या लागत ह्मणून पाटलानें आपल्या हमीदारीप्रमाणें शत्रूच्या देण्यांतून चट्कर मुक्त होण्यासाठीं आपल्या गांवच्या लोकांची यादी करून, त्यांचे नांवापुढें प्रत्येकानें, प्रसंग आल्यास किती पैसे द्यावयाचे, ह्याचा आंकडा टाकलेला असे. आणि वेळ आला ह्मणजे त्या यादीप्रमाणें पैसे गोळा करून आलेल्या पेंढाऱ्यांकडे भरपाई करावी व संकटमुक्त व्हावें, अशी त्याची योजना असे. ह्या योजनेंत त्याच्या कमीजास्त द्रव्यलोभाप्रमाणें त्यालाही पैसे दाबण्यास सांपडत.

राजकीय संबंधाची ही जी येथवर हकीकत दिली आहे ती बरीच लांबली असल्यामुळें आतां पुरी केली पाहिजे. इंग्लिशांशीं तह केल्यानंतर ह्या राण्याच्या कारकीर्दींत विशेष महत्वाचें कांहीं घडलें नाहीं. व तो सन १८२९ त मरण पावला.

---

## भाग सतरावा.

## आलीकडचे राणे.

महाराणा जवानसिंह.—महाराणा सरदारसिंह.—महाराणा स्वरूपसिंह.—महाराणा शंभुसिंह.—महाराणा सज्जनसिंह.—महाराणा फतेसिंह.

### महाराणा जवानसिंह.

तीर्थरूपांच्या मरणानंतर जवानसिंह हा सन १८२९ सालीं गादीवर बसला. सन

१८३२ सालीं त्यानें लॉर्ड वुइल्यम् बेंटिंक, हिंदुस्थानचे गव्हर्नर् जनरल् व व्हाई-सरॉय्, ह्यांची मुलाखत घेतली. राज्यांतील तंटेबखेडे व वाईट गोष्टी ह्यांचा बंदोबस्त करून लोकांना सुख लागेल अशी व्यवस्था करण्याची ह्याच्यांत शक्ति नव्हती. परंतु हा फार उदार असल्यामुळें लोक ह्याची तारीफ करीत. ह्याच्या कारकीर्दींत उत्पन्न थोडें आणि खर्च फार, असा प्रकार झाल्यामुळें राज्यास वीस लाख रुपयांचें कर्ज झालें. पैकीं आठ लक्ष रुपये इंग्लिशसरकारची खंडणी थकल्यामुळें त्यांचें देणें झालें होतें. राज्यव्यवस्था सुधारून आपल्या खंडणीचा ऐवज देण्याविषयीं इंग्लिशसरकाराकडून ह्यास पुष्कळ वेळां सूचना झाल्या होत्या. ह्यानें दहा वर्षें राज्य केलें, व हा सन १८३९ सालीं मरण पावला. ह्याला औरस पुत्र नसल्यामुळें दत्तक देण्याची जरूर पडली.

## महाराणा सरदारसिंह.

सरदारसिंह हा वागौरचा जहागीरदार होता; व संग्रामसिंहापासून हा चवथ्या पिढींतील होता, व हाच काय तो जवळचा नातलग असल्यामुळें ह्यास दत्तक घेण्यांत आलें. राज्याबरोबर ह्याजवर जबर कर्जाचाही बोजा पडला. हा स्वभावानें फार कडक होता, ह्या कारणानें सर्व सरदार लोक ह्याजवर असंतुष्ट होते; व राज्याच्या पश्चिम व दक्षिण भागांतील भिल्ल लोकांनीं बंडाळी माजविली. ही बंडाळी मोडण्याकरितां सरदारसिंहानें इंग्लिश सरकारची मदत मागितली; पण ती त्यास मिळाली नाहीं. सन १८४० सालीं मेजर रॉबिन्सन् ह्यांनीं मध्यस्थी करून ह्याजमध्यें व त्याच्या सरदारांमध्यें तहनामे करून दिले. पण पुढच्याच वर्षीं दक्षिण भागांत पुनः दंगे सुरू झाले. हे दंगे मोडण्याकरितां इंग्लिश सरकारानें भिल्ल लोकांची एक नवीन पलटण नेमून तिला 'भिल्ल कोर' हें नांव दिलें. ह्या पलटणीबद्दल सालीना खर्च एक लक्ष वीस हजार रुपये होत होता; व त्यांजपैकीं महाराण्यानें पन्नास हजार रुपये देण्याचें कबूल केलें. सरदारसिंह हा सन १८४३ सालीं मरण पावला. ह्या वेळीं राज्याची व्यवस्था चांगली नव्हती. सबब राज्याची सुधारणा करण्याचा भार ह्याचा वारस स्वरूपसिंह ह्याजवर पडला.

## महाराणा स्वरूपसिंह.

स्वरूपसिंह हा पूर्वींच्या महाराण्याचा भाऊ होता, व त्याच्या मरणानंतर हा सन १८४३ सालींच गादीवर बसला. खंडणीचे पैसे थकले असल्यामुळें ह्या दरबारीं असलेल्या पोलिटिकल् कामगारांनीं आपल्या सरकारास बरेच वेळ खबर दिली. तेव्हां सन १८४६ सालीं असा ठराव झाला कीं, महाराण्यानें प्रतिवर्षीं इंग्लिश सरकारास

इंग्लिश शिक्का दोन लाख रुपयें देत जावे. स्वरूपसिंह हा मोठा महत्वाकांक्षी असून, कडक स्वभावाचा होता; ह्यामुळें त्याचें व त्याच्या सरदारांचें पटत नसे. सन १८४० सालीं कर्नल रॉबिन्सन् ह्यांच्या मध्यस्थीनें महाराण्यांत व सरदारांत जो तहनामा झाला होता, त्यास अनुसरून सरदार वागले नाहींत, सबब सन १८५४ सालीं कर्नल सर् हेन्री लॉरेन्स् ह्यांच्या मार्फत दुसरा तहनामा झाला. स्वरूपसिंह ह्याच्या भावाचा मुलगा शार्दूलसिंह ह्यास ह्यानें दत्तक घेतलें असून, त्याच्या मनांत राज्यावर आरूढ होण्याचें विशेष असल्यामुळें तो आपणास विषप्रयोग करील अशी स्वरूपसिंहास फार भीति होती; व त्या भीतीमुळें महाराण्यानें त्याला अटकेंत ठेविलें होतें. पण ही कैद त्यानें थोडेच दिवस भोगिली. कारण, तो कैदेंतच मरण पावला.

सन १८५७ त जेव्हां शिपायांनीं बंड केलें त्या वेळीं इंग्लिश सरकाराशीं महाराण्याचें फारच उत्तम प्रकारचें वर्तन होतें. इंग्लिश सरकारचे जे लोक ह्याच्या आश्रयास येऊन राहिले होते त्यांच्या खाण्यापिण्याचा ह्यानें उत्तम बंदोबस्त ठेवून ज्यांना जिवाची भीति होती त्यांनाही ह्यानें उत्तम प्रकारें संभाळलें. परंतु ह्या मित्रत्वांच्या वर्तनाबद्दल सरकाराकडून ह्याला मुलूख वगैरे कांहीं एक नवीन बक्षिस मिळालें नाहीं, इतकेंच नाहीं; तर ह्याच्या राज्यांतील नीमच, जावद व गोदवाड हे भाग जे इंग्लिश सरकाराकडे गेले होते तेही परत देण्यांत आले नाहींत! स्वरूपसिंह हा सन १८६१ सालीं मरण पावला. हा महाराणा फार हुशार होता, व ह्याच्या कारकीर्दींत नवीन सुधारणा बऱ्याच झाल्या, व बरेचे सरदार ह्याजवर खुष होते. ह्यानें आपल्या नांवाचें नाणें पाडलें असून, तें अद्यापि चालत आहे.

## महाराणा शंभुसिंह.

महाराणा स्वरूपसिंह हा मरण पावल्यानंतर त्याच्या पुतण्याचा ह्मणजे कैदेंत मरण पावलेल्या शार्दूलसिंहाचा मुलगा शंभुसिंह ह्यास दत्तक देऊन गादीवर बसविलें. शंभुसिंह गादीवर बसला त्या वेळीं त्याचें वय १४ वर्षांचें होतें; व इंग्लिशसरकारच्या कायद्याप्रमाणें १८ वर्षांचें ह्याचें वय होईपर्यंत हा अल्पवयस्क मानण्यांत आल्यामुळें राज्याची व्यवस्था पाहण्याकरितां तीन कामदारांची एक मंडळी नेमण्यांत आली. ह्या मंडळींतील दोघे पंच असून, एक सरपंच होता. परंतु ह्या पंचांत तंटे पडून, ते एकमेकांशीं वैमनस्यानें वागूं लागले. तेव्हां पोलिटिकल् ऑफिसरांच्याच मदतीस दोन पंच देऊन त्यानें सर्व राज्याची व्यवस्था ठेवावी असा ठराव झाला. राज्याची व्यवस्था कशी ठेवावी ह्याचें महाराण्यास ज्ञान यावें व त्यास चांगली लायकी यावी ह्मणून त्यालाही ह्या मंडळींत घेतलें होतें. ह्या अवधींत राज्याचा वसूल वाढला;

राज्यांत सडका बांधण्यांत आल्या; शाळा घालण्यांत आल्या; व ठिकठिकाणीं दवाखाने घातले. सन १८६५ सालीं महाराणा वयांत आला; तेव्हां त्याचें राज्य त्याच्या स्वाधीन केलें. ह्या वेळीं खजिन्यांत वीस लक्ष रुपये शिल्लक होते. परंतु लवकरच राज्याची व्यवस्था बिघडली.

महाराण्यानें लक्ष्मणराव नांवाच्या दिवाणास दूर करून कोठारी केसरीसिंह ह्यास त्या कामावर नेमलें. ह्या गोष्टीस पोलिटिकल् ऑफिसर कर्नल् हचिन्सन् ह्याचें अनुमोदन होतें. महाराण्याचा ठाकूर अमूपसिंह ह्या नांवाचा एक मित्र होता. परंतु महाराण्यास अशा मनुष्याची संगति असल्यापासून त्याचें फार नुकसान होईल असें पोलिटिकल् ऑफिसर् ह्यास वाटूं लागलें. इंग्लिश सरकारच्या मुलखांतील पद्धतीवर सन १८७० सालीं महाराण्यानें मुलकी अदालत स्थापन केली; परंतु ही व्यवस्था सरदार लोकांस पसंत पडली नाहीं. त्याच वर्षी हिंदुस्थानचे व्हाईसरॉय् व गव्हर्नर् जनरल् लॉर्ड् मेयो हे अजमीर येथें आले होते. तेथें त्यांनीं मोठा दरबार भरवून शंभुसिंहाला पहिली जागा दिली. सन १८७१ सालीं पोलिटिकल् एजंट कर्नल् ब्रूक् ह्यांच्या मार्फत महाराण्यास 'जी. सी. एस्. आय्.' हा किताब मिळाला. ह्याच सुमारास दिवाण केसरीसिंह कोठारी हा मरण पावला. महाराणा शंभुसिंह हा सन १८७४ सालीं बारा वर्षें दहा महिने व वीस दिवस राज्य करून मरण पावला. ह्याला विद्येचा फार नाद होता. ह्यानें एक मोठें विद्यालय स्थापन केलें असून, 'शंभुनिवास' ह्या नांवाचा एक राजवाडा बांधला. शंभुसिंह हा फार लोकप्रिय होता, व त्याच्या मरणाबद्दल लोकांस फार वाईट वाटलें. महाराण्याच्या बायकांनीं नवऱ्याच्या प्रेताबरोबर सती जावें असा ह्या वेळपर्यंतचा परिपाठ होता. परंतु पोलिटिकल ऑफिसर् कर्नल् ईड् ह्यांनीं सर्व राण्यांची बेदला राव बखतसिंह ह्याच्या मदतीनें समजूत घालून त्यांस सती जाऊं दिलें नाहीं. मेवाडच्या राजघराण्यांतील महाराण्याच्या बायका सती न गेल्याचें हें पहिलेंच उदाहरण होय.

## महाराणा सज्जनसिंह.

महाराणा सज्जनसिंह हा थोरल्या राणीसाहेबांच्या व सरदार लोकांच्या मदतीनें सन १८७४ सालीं गादीवर बसला. हाही दत्तकच होता. गादीवर बसण्याच्या वेळीं त्याचें वय १५ वर्षांचें होतें. ह्यास उत्तम प्रकारचें शिक्षण देण्याकरितां बेहारीलाल ह्यांची योजना केली होती, व त्यांच्याच परिश्रमानें ह्याला इंग्रजी, उर्दू व हिंदी ह्या भाषांचें ज्ञान झालें. ही व्यवस्था ६ महिने चालली. सन १८७५ सालीं ईडरचे महाराज ह्यांच्या बहिणीबरोबर ह्यांचें लग्न ठरून ह्यांस तिकडे जाणें जरूर झालें.

ह्याच सुमारास प्रिन्स् ऑफ् वेल्स् हे मुंबईस आले होते. ह्यामुळें ह्यांस तेथें जावें लागलें. ह्याप्रमाणें प्रवास करावे लागल्यामुळें ह्यांच्या विद्याभ्यासास फार अडचणी आल्या. हिंदुस्थानचे व्हाईसरॉय् लॉर्ड् नॉर्थब्रुक् हे उदेपुरास आले होते, त्या वेळीं त्यांचा पाहुणचार ह्यांनीं फारच चांगल्या रीतीनें ठेवल्यामुळें ते ह्यांजवर फारच खुष झाले. सन १८७८ सालीं लॉर्ड् लिटन् साहेबांनीं दिल्लीस जो बडा दरबार भरविला होता त्यास हे गेले होते. त्या वेळीं महाराण्यास पहिली जी १९ तोफांची सलामी मिळत होती ती पालटून २१ तोफांची केली; व दिवाण पन्नालाल व कोठारी छगनलाल ह्यांना 'राय' हा किताब देण्यांत आला. सज्जनसिंह ह्यास एकंदर राज्याचा अधिकार सन १८७८ सालीं मिळाला.

राज्यव्यवस्थेंत ह्यांनीं नवीन सुधारणा करून एक 'कौन्सिल् इजलास खास' ह्या नांवाचें अधिकारीमंडळ नेमून त्याजकडे सर्व तक्रारींची दाद घेण्याचें काम सोंपविलें. सुशिक्षित व हुशार लोकांस मोठमोठ्या जागा देण्याचा ह्यांनीं परिपाठ घालून दिला, व फौजेस इंग्लिश पद्धतीवर कवाईत शिकविण्याचें सुरू केलें. पोलिसची व्यवस्था सुधारली. खिस्ती मिशनरींना ह्यांच्याच कारकीर्दींत पहिल्यानें ह्या राज्यांत जागा मिळाली. सन १८८१ सालीं दक्षिणभागांतील पहाडी मुलखांत भिल्ल लोकांनीं दंगा केला. हा दंगा मोडण्याकरितां फौज पाठविली होती; परंतु भिल्ल लोकांना जशी शिक्षा व्हावी तशी झाली नाहीं. सन १८८२ सालीं व्हाईसरॉय् लॉर्ड रिपन् हे चितोड मुक्कामीं आले होते. त्या वेळीं त्यांनीं महाराणी साहेबांकडून आलेला 'जी. सी. एस. आय्.' हा किताब देण्याचा समारंभ केला. सन १८८३ सालीं ह्यांस ईडरच्या राणीसाहेबांपासून पुत्ररत्न झालें. ह्यांच्या पूर्वींचे चार महाराणे औरस पुत्र न होतां मरण पावले होते. परंतु ह्यांसही झालेलें पुत्ररत्न फार वेळ टिकलें नाहीं. ह्याच वर्षी ह्यांना भेटण्याकरितां जोधपूरचे महाराज जसवंतसिंह व कृष्णगडचे शार्दूलसिंह हे उदेपुरास आले होते. चितोडपासून उदेपुरापर्यंत रेलवेची सडक करण्याचें ह्यांच्या मनांत फार होतें; पण तें काम झालें नाहीं. ह्यांचा अंत सन १८८४ सालीं डिसेंबरच्या २३ व्या तारखेस झाला. ह्यांनीं मोठमोठ्या शाळा व दवाखाने ह्यांची स्थापना केली. हे स्वभावानें बरेच कडक असत. ह्यांनीं शहराच्या बाहेर पश्चिम बाजूस 'सज्जनगड' ह्या नांवाचा एक किल्ला बांधला, व पश्चिम आणि दक्षिण ह्यांच्या दरम्यान शहराच्या बाहेर 'सज्जनविलास' ह्या नांवाचा एक सुंदर बगीचा तयार केला.

## महाराणा फत्तेसिंह.

कर्नल् वॉल्टर व सरदार लोक ह्यांच्या मदतीनें सन १८८४ सालीं २४ डिसेंब-

रच्या सायंकाळीं महाराणा फत्तेसिंह हे गादीवर बसले. ह्यांच्या भेटीस जोधपूर, जयपूर, कृष्णगड व ईडर येथील महाराज ह्या सुमारास आले होते. ह्यांस राज्याचा कारभार सन १८८५ सालीं देण्यांत आला. ह्याच वर्षी तारीख ८ नोव्हेंबर रोजीं लॉर्ड डफरीन् हे उदेपुरास आले होते. व हे दोन दिवस तेथें राहून तारीख १० रोजीं परत गेले. सन १८८७ सालीं जान्युआरी महिन्यांत ह्यांस 'सी. आय्. ई.' हा किताब मिळाला, व फेब्रुआरींत 'जी. सी. एस्. आय्.' हा किताब मिळाला. ह्याच सालीं नोवेंबर महिन्यांत ह्यांस पुत्ररत्न झालें. ह्या संबंधाचा आनंद प्रदर्शित करण्याकरितां सहा सात लक्ष रुपये धर्मादाय खर्च करण्यांत आले.

---

# परिशिष्टें.

## ( १ )

### राजावलि १.

### सूर्यचंद्रवंशीय इक्ष्वाकु आणि बुध यांपासून राम व कृष्ण यांजपर्यंत.



| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २३. त्रिशंकु. | हविष्मन्. | कृतवीर्य. | * | | |
| २४. हरिश्चंद्र. | जामुग. | सहस्रार्जुन. | * | | |
| २५. रोहित. | सव्यपी. | शूरसेन. | * | | |
| २६. हारीत. | विदर्भ. | सूर. | दुष्यंत. | | |
| २७. चंपा. | केशुक. | द्रष्टा. | भरत. | | |
| २८. विजय. | लोमपाद. | कृष्ण. | वितथ (भरद्वाज). | | |
| २९. बरुक. | धृति. | जयध्वज. | मन्यु. | | |
| ३०. वृक्ष. | जीमुत. | कुच्च. | बृहत्क्षेत्र. | | |
| ३१. बाहुक. | ऋषभ. | जंघ. | सहोत्र. | | |
| ३२. सगर. | भीमरथ. | तालजंघ. | हस्ति. | | |
| ३३. केशी. | नवरथ. | भीतोत्र. | अजमीढ. | | |
| ३४. असमंजस. | दिधृत. | दृशित. | ऋक्ष. | | |
| ३५. अंशुमान्. | शकुंत. | यवन. | संवर्ण. | | |
| ३६. दिलीप. | करंटिक. | दुर्जय. | कुरु. | | |
| ३७. भगीरथ. | कर. | | सुदेण. | परीक्षित. | |
| ३८. श्रुतसेन. | देवरात. | | सहोत्र. | जन्हु. | |
| ३९. नाभाग. | देवक्षत्र. | | च्यवन. | सुरथ. | |
| ४०. अंबरीष. | माधि. | | कृतमन्यु. | विदूरथ. | |
| ४१. सिंधुद्वीप. | दुर्वसु. | | विश्रिथ. | सार्वभौम. | |
| ४२. अयुतायु. | पूरहोत. | | उपरिचर. | जयसेन. | |
| ४३. ऋतुपर्ण. | गुणी. | | बृहद्रथ. | राधिक. | |
| ४४. नल. | पादुप. | | कुशाग्र. | अयुतायु. | |
| ४५. सिरुह. | यंतु. | | वृषभ. | क्रोधन. | |
| ४६. शिवदास. | सात्वती. | | सुतिथ्य. | देवातिथि. | |
| ४७. अश्मुक. | अंधक (टाक). | | पुष्पावन. | ऋक्ष. | |
| ४८. मल्लक. | कक्क. | भुजमान. | जह्नू. | भीमसेन. | |
| ४९. सत्वरिथ. | सत्यवान्. | विदूरथ. | ऊर्ज. | दिलीप. | |
| ५०. ऐद्वीर. | विलोम. | शूर. | बृहद्रथ. | प्रतीप. | |
| ५१. विश्वसह. | कुपुत्रोम. | सेनी. | जरासंध. | शंतनु. | |
| ५२. खरभंग. | अनु. | भोज. | | विचित्रवीर्य. | |
| ५३. दीर्घबाहु. | अंधक. | राधिक. | | पंडु. | धृतराष्ट्र. |
| ५४. दिलीप. | दुंदुभी. | देवमीढ. | | अर्जुन. | दुर्योधन. |
| ५५. रघु. | धीरदत्त. | शूर. | | अभिमन्यु. | |
| ५६. अज. | पुनर्वसु. | वसुदेव. | | परीक्षित. | |
| ५७. दशरथ. | अक्रूक. | श्रीकृष्ण. | | | |
| ५८. रामचंद्र. | देवक (उग्रसेन). | | | | |
| | कंस. | | | | |

# रांजावलि २.

## रामकृष्णांपासून इसवी सन ७२० पर्यंत.

| | पहिला वंश. | पहिला वंश. |
|---|---|---|
| १. रामचंद्र. | जरासंध. | परीक्षित. |
| २. लहु. कुश. | * | जनमेजय. |
| ३. अतिथ. | मार्जारी. | अश्मंद. |
| ४. निषध. | सोमपी. | अधन. |
| ५. नल (नभ). | श्रुतश्रवा. | महाजन. |
| ६. पुंडरीक. | अयुताश्व. | जेश्रित. |
| ७. मेगधन. | नीरमित्र. | देहत्वान्. |
| ८. बाल. | सूनीक्षेत्र. | उग्रसेन. |
| ९. शूल. | बृहत्सेन. | शूरसेन. |
| १०. वज्रनाभ. | सेनाजित. | सूतश्याम. |
| ११. सुजंश. | श्रुतंजय. | ऋष्मराज. |
| १२. विशिताश्व. | विहर. | बचिल. |
| १३. विधृत. | सूब्रि. | सूतपाल. |
| १४. हिरनाभ. | शम्य. | नरहरदेव. |
| १५. पुष्पक. | सव्रत. | जेश्रित. |
| १६. सुदर्शन. | धर्म. | भूपात. |
| १७. अग्निवर्ण. | सुश्रम. | शिववश. |
| १८. शीघ्र. | धृतसेन. | मेधावी. |
| १९. मरू. | सुमति. | श्रावण. |
| २०. पृशिसूत. | सुवाली. | कीकण. |
| २१. सत्संद. | सुनीत. | पधारत. |
| २२. अमरसंद. | सत्यजित. | दस्युनम. |
| २३. अवश्वन. | विश्वजित. | अधेलिक. |
| २४. विश्वासव. | रिपुंजय. | हंतवर्ण. |
| | **दुसरा वंश.** | |
| २५. प्रसेनजित. | प्रीतोदन. | धुंडपाळ. |
| २६. तक्षक. | पालक. | धुंसाळ. |
| २७. बृहद्बल. | विश्वकूप. | सेनपाळ. |
| २८. बृहद्वीर. | रजक. | खेवलराज. |

| | | |
|---|---|---|
| २९. ऊरुक्रिय. | नंदिवर्धन किंवा तक्षकः[1] | विश्रवा. |
| | **तिसरा वंश.** | **दुसरा वंश.** |
| ३०. बकवृद्ध. | सहस्रनाग. | सुरेंद्र. |
| ३१. पृथिव्योम. | कर्कवर्म. | सीरशाह. |
| ३२. भानु. | क्षेत्रधर्म. | आहंगसाळ. |
| ३३. सहदेव. | कीर्तिओघ. | वैरिजित. |
| ३४. बृहदश्व. | विदूसर. | दुर्वेर. |
| ३५. बाहुमान्. | अजितशत्रु. | सोदपाळ. |
| ३६. प्रतिकुश्व. | दुभोक. | शूरसूनु. |
| ३७. सुप्रतीक. | अजय. | सिंगराज. |
| ३८. मुरोदेव. | नंदिवर्धन. | उमरगोदा. |
| ३९. सोनिक्षेत्र. | महानंद. | उमरपाल. |
| ४०. पुष्कर. | सुमाल्य. | सर्वेह. |
| | **चौथा वंश.** | |
| ४१. ऋक्ष. | चंद्रगुप्त. | पधारत. |
| ४२. सूथ. | वरूसर. | मुदपाल. |
| ४३. अमित्रजित. | अशोक. | महाराज. |
| | | **तिसरा वंश.** |
| ४४. बृहद्राज. | सुजाश्व. | श्रीसेन. |
| ४५. बारिकेतु. | संगत. | महिपाळ. |
| ४६. कृतंजय. | केशलीसुख. | महावलि. |
| ४७. ऋणंजय. | सोमशर्मा. | श्रूपवर्ती. |
| ४८. संजय. | षड्धनु. | नेत्रसेन. |
| ४९. शाक्य. | बृहद्रथ. | सुमुखदन. |
| | **पांचवा वंश.** | |
| ५०. सुदीप. | उष्टिमित्र. | जेठमल. |
| ५१. संगल. | वसुमित्र. | कलंक. |
| ५२. प्रसेनजित्. | बद्रिक. | कलमन. |
| ५३. रोमिक. | पुलिंद. | सिरमर्दन. |
| ५४. सूरित. | घोष. | जयवंग. |
| ५५. सुमित्र. | वज्रभूमि. | हरगुज. |
| ५६. * | भागवत. | हीरसेन. |
| ५७. * | देवभूति. | अंतिनायी. |
| | **सहावा वंश.** | **चौथा वंश.** |
| ५८. * | भूमित्र. | दूधसेन. |
| ५९. * | परेण. | सेनध्वज. |

१. याणें जैनधर्म स्थापिला व अबूवर जैनमंदिरें बांधिलीं. हा नागकुळाचा मूळपुरुष असून इ० स० पूर्वी ५५८-६०० यामध्यें झाला.

**मेवाडच्या राण्यांचा वंश.**

| | | |
|---|---|---|
| ६०. महारित. | सुशर्मा. | महागंग. |
| | **सातवा वंश.** (शूद्र राजे.) | |
| ६१. अंतरित. | कृष्ण. | नद. |
| ६२. अचलसेन. | संतकर्ण. | जीवन. |
| ६३. कनकसेन.[1] | पुरमार. | उदय. |
| ६४. महामदनसेन. | लंबोदर. | जहल. |
| ६५. सुदंत. | चिवल्लक. | आनंद. |
| ६६. विजयसेन[2] (अजयसेन). | मेघस्वत्. | राजपाल. |
| ६७. पद्मादित्य. | अनिष्टकर्मा. | |
| ६८. सेवादित्य. | हलाई. | |
| ६९. हरादित्य. | तिलक. | |
| ७०. सूर्यादित्य. | पुरुषवर. | |
| ७१. सोमादित्य. | सुदर्शन. | |
| ७२. शिलादित्य. | चकत. | |
| ७३. ग्रहादित्य. | शिवस्वाद. | |
| ७४. नागादित्य. | अरिंदम. | |
| ७५. भगादित्य. | गोमती. | |
| ७६. देवादित्य. | पुरिमन्. | |
| ७७. आशादित्य. | मेदशिरा. | |
| ७८. कलभोज. | सखंद. | |
| ७९. ग्रहादित्य. | योगसूरी. | |
| ८०. बाप्पा[3] रावळ. | विजय. | |
| | चांद्रबीज. | |
| | सालंधी.[4] | |

---

१. याणें सौराष्ट्र देश जिंकून घेतला (वि० सं० २०० ह्मणजे इ० स० १४४). २. याला जयसिंग राजा 'नौसिरवान' असें ह्मणत असे. याणें सौराष्ट्रांत विराटगृह नामक शहर बांधिलें, व वि० सं० ३७५ ह्मणजे इ० स० ३१९ मध्यें वल्लभी शक स्थापिला. ३. हा चितोड येथें वि० सं० ७७० ह्मणजे इ० स० ७१४ त मेला. हा दाशरथी रामचंद्रापासून ८० वा पुरुष होता. ४. बाप्पा रावळ, मेवाडच्या राण्यांचा पूर्वज, याशीं समकालीन.

# राजावलि ३.

## बाप्पा रावळापासून उदेपूरची राजावलि, त्या राजांना समकालीन असणारे मुसलमानी बादशाह वगैरे आणि विशेष गोष्टी.

| उदेपूरचे राजे (राणे). | त्यांचा काल (इसवी सन.) | त्यांशीं समकालीन बादशाह वगैरे व विशेष गोष्टी. |
|---|---|---|
| १. बाप्पा रावळ. ... | ७१३ ... ... ... | वलीद महंमद निसबत खलिफा उमर.—यानें इ० स० ७२८ त चितोडास गादी स्थापन केली. |
| २. अपराजित. ... | ७६४ ... ... ... | अल् मन्सूर. |
| ३. कलभोज. ... ... | ८०९ ... ... ... | हरून् अल् रशीद. |
| ४. नंदकुमार. ... ... | ८१५ ... ... ... | |
| ५. खुमान. ... ... | ८३६ ... ... ... | अल् मामून. |
| ६. योगिराज.... ... | | |
| ७. * | | |
| ८. * | | |
| ९. * | | |
| १०. * | | |
| ११. शक्तिकुमार. ... | ९६८ ... ... ... | अल् एप्तेगीन. |
| १२. * | | |
| १३. नरवर्म. ... ... | ९९० ... ... ... | सबक्तेगीन.-चितोडावर हल्ला. |
| १४. यशोवर्म. ... ... | १०२० ... ... ... | माहमूद गिजनवी. |
| १५. * | | |
| १६. * | | |
| १७. सँमरसी (समरसिंह). | ११५० ... ... ... | शहाबुद्दीन गोरी.—इ० स० ११९३ त मुसलमानांशीं झालेल्या पृथ्वीराजाचे लढाईत मेला. |
| १८. कर्ण गेहेलोट. | ११९३ ... ... ... | |

| | | | |
|---|---|---|---|
| १९. राणा रुहूप सिसोदिया (चितोडचा राजा). | १२०१ | ... ... ... कुतुबुद्दीन.—यानें **रावळ** हें पद बदलून त्या ठिकाणीं **राणा** हें पद चालू केलें. | |
| २०. * | | | |
| २१. * | | | |
| २२. * | | | |
| २३. * | | | |
| २४. * | | | |
| २५. * | | | |
| २६. पृथ्वीमल्ल. ... ... | | | |
| २७. भुन्सी. ... ... | | | |
| २८. चंद्र. ... ... | ... ... ... ... | दिल्लीचा राजा. | |
| २९. लैखमसी (लक्ष्मणसिंह). | १२७५ | ... ... ... अल्लाउद्दीन.—चितोडावर गर्दी व पद्मिनी राणीचे संबंधानें धामधूम. | |
| ३०. उरसी (ऊरसिंह). ... | | चितोड येथें पहिला जोहार. | |
| ३१. हंमीर. ... ... | १३०१ | ... ... ... यानें १३१३ मध्यें चितोड परत घेतलें. | अजयसिंह. सजनसिंह. दिलीपजी. |
| ३२. खेतसी (क्षेत्रसिंह).... | १३६५ | ... ... ... दक्षिणेंत आला. | शिवाजी. |
| ३३. लाखा राणा. ... | १३७३ | ... ... ... | भोराजी. |
| ३४. मोकलजी. ... ... | १३९८ | ... ... ... तैमूरलंग. | देवराज. |
| ३५. कुंभो राणा. ... | १४१९ | ... ... ... याची स्त्री मिराबाई.—यास याचे पुत्रानेंच मारिलें. | उग्रसेन. मालोजी खेलोजी. जनकोजी. |
| ३६. उदा राणा (हत्यारी). | १४६९ | ... ... ... | सटवाजी. |
| ३७. रायमल्ल. ... ... | १४७४ | ... ... ... | शाहाजी. |
| ३८. सैंग राणा. ... ... | १५०९ | ... ... ... बाबर.—बाबा नानकाचा उदय. | शिवाजी (छत्रपति). |
| ३९. रत्नसिंग ... ... | १५३० | ... ... ... | |
| ४०. विक्रमाजित ... | १५३५ | ... ... ... चितोडावर गुजराथचे बहादुरशाहाची गर्दी.—चितोड येथें दुसरा जोहार. तें पुनः राण्यानें घेतलें. | |

| | | |
|---|---|---|
| ४१. बनबीर. | | |
| ४२. उदेसिंग. | १५४१ | अकबर (१५६७).–चितोड घेतलें.–चितोड येथ तिसरा जोहार. |
| ४३. *प्रतापसिंग. | १५७२ | उदेपूर वसविलें.–कुमळमेरास राहिला.–मोंगलांशीं सोयरीक केली नाहीं.–हळदी घांटाची लढाई. |
| ४४. अमरसिंग. | १५९७ | शाहजहानास शरण गेला.–चितोड घेतलें. |
| ४५. कर्ण. | १६२१ | |
| ४६. जगत्सिंग. | १६२८ | |
| ४७. *राजसिंग. | १६५४ | जेजिया.–यानें जोधपूरची राजकन्या इला औरंगजेब नेत होता ती हिरावून घेतली. |
| ४८. जयसिंग. | १६८१ | |
| ४९. अमरसिंग, दुसरा. | १७०० | |
| ५०. संग्रामसिंग | १७१६ | |
| ५१. जगत्सिंग, दुसरा. | १७३४ | मल्हारजी होळकर याची गर्दी. |
| ५२. प्रतापसिंग, दुसरा. | १७५२ | जनकोजी शिंदे व रघुनाथराव पेशवे यांची गर्दी. |
| ५३. राजसिंग, दुसरा. | १७५५ | |
| ५४. ऊरसिंग, दुसरा. | १७६२ | मारला गेला. |
| ५५. हमीर, दुसरा. | १७७२ | दिवाण अमरचंद. |
| ५६. भीमसिंग. | १७७८ | कृष्णाकुमारी कन्या.–अमीरखान व महादजी शिंदे यांच्या लढाया.–इंग्रजांशीं तह. |
| ५७. जवानसिंग. | १८२८ | |
| ५८. सरदारसिंग. | १८३८ | |
| ५९. सुरूपसिंग. | १८४२ | |
| ६०. शंभुसिंग. | १८५१ | हा मुलगा लहान होता ह्मणून पोलिटिकल एजंट कर्नल ईडन यांनीं इ० स० १८६४ पर्यंत कारभार पाहिला; व पुढें १८६५ त राणा गादीवर बसला.–दत्तकाची सनद. |
| ६१. सज्जनसिंग | १८७४ | सत्रा तोफांची सलामी. |

* राजस्थानांतील रजवाड्यांच्या इतिहासांत हे मोठे पराक्रमी राजे झाले.

# चितोंडगड.

चितोडगड हा किल्ला उदेपुरचा इतिहास लिहिणाऱ्या ग्रंथकारानें पाहिला असून, त्यानें त्याच्या संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें माहिती दिली आहे:—

चितोडगड किल्ल्याच्या पायथ्याशीं चितोड या नांवाचें शहर असून, डोंगरावर हा किल्ला बांधला आहे. हल्लीं त्या किल्ल्यांत पायदळ पलटणीचे तीनशें लोक असतात. किल्ल्यावरील जीर्ण झालेल्या इमारतींची दुरुस्ती करण्याकरितां दरमहा तीनहजार रुपयांची मंजुरी मिळाली असून, नेहमीं डागडुजीचें काम सुरू असतें. किल्ल्यावर पुष्कळ घरें असून तलावही अनेक आहेत. किल्ल्याच्या मध्यभागीं कुंभो राण्याचा एक भव्य जयस्तंभ असून, त्याचेच शेजारीं आणखी एक जयस्तंभ आहे. तो कोणाचा असावा याविषयीं बरोबर माहिती मिळत नाहीं. पूर्वी किल्ल्यांत फार मोठी वसाहत असावी अशाविषयीं पुष्कळ खुणा मिळत असून, त्या वसाहतीचे साक्षीभूत मोठमोठे महाल अद्यापिही आहेत; व लाखों रुपयांच्या इमारती हल्लीं जीर्ण व भग्न स्थितींत असलेल्या दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें युद्धोपयोगी सामुग्री ठेवण्याचीं मोठमोठीं कोठारें (भुयारें) आहेत. पद्मिणी राणीचा महाल एका तलावांत असून हल्लीं तो दुरुस्त केला आहे. चितोडगडच्या किल्ल्यापासून उदेपूर ३० कोस आहे. उदेपुरास जाण्याचे दोन मार्ग आहेत. एक निंभेडाच्या स्टेशनावरून असून, दुसरा अजमेरावरून आहे.

---

# उदेपूर.

उदेपूर शहर या ग्रंथकर्त्यानें पाहिलें असून त्याविषयीं तो असें लिहितो:—

उदेपूर हें शहर एका मोठ्या तलावाच्या कांठीं आहे. हा तलाव प्रशस्त व विस्तीर्ण असून त्याचें नांव पिशोला असें आहे. ह्या तलावांत जगन्निवास व जयमंदिर असे दोन मोठाले वाडे आहेत. ह्या वाड्यांत जाण्याकरितां व जलपर्यटन करण्याकरितां त्या तलावांत सात आठ नावा नेहमीं पडलेल्या असतात. वर कळविलेल्या वाड्यांतील पहिला जगत्सिंगानें बांधला असून, दुसरा जयसिंगानें बांधला. दुसऱ्या वाड्यांत संगमरवरी दगडाची एक फारच सुरेख व शोभायमान बाराद्वारी बांधली आहे व ती अवश्य पाहण्यासारखी आहे.

उदेपूर शहरापासून दोन कोसांवर उदेसागर नांवाचा एक दुसरा मोठा तलाव असून तो उदेसिंगानें बांधला आहे. त्याचप्रमाणें तेथून जवळच राजसागर नांवाचा आणखी एक तलाव आहे व तो राजसिंगानें बांधला आहे. उदेपुरापासून २० कोसांवर जयसागर नांवाचा समुद्रासारखा अफाट तलाव आहे त्यास ढेबरचा तलाव असें ह्मणतात. त्याचे काठीं वृषभनाथाचें मंदिर आहे.

उदेपुरांत चार देवस्थानें फारच मोठीं आहेत. त्यांत पहिलें वृषभनाथाचें, दुसरें एकलिंगजीचें, तिसरें नाथद्वारचें, व चवथें चतुर्भुजनाथाचें. या चारी देवांचे पृथक् पृथक् असे चार जामदारखाने ह्मणजे खजिने असून, ते तेथील राजाचे ताब्यांत आहेत. राजतलावावर (ह्या वर कळलेला राजसागर असावा) चौकी आहे. ह्या चौकीजवळ, ज्या राण्यांनीं आपल्या देहाच्या भारंभार सोनें वजन करून त्याचा धर्मांकडे विनियोग केला त्यांचीं तोरणें बांधलीं आहेत. अशा प्रकारचीं तोरणें तेथें अनेक आहेत. त्या तलावाच्या पलीकडील टोकावर काकरोळी नांवाचें संस्थान असून, त्यावर गोसांवी महाराजांचा अधिकार आहे. तेथें ज्या मूर्तीची पूजा, अर्चा व मुख्योपासना होत असते ती अंबरीष नांवाच्या राजाची होती असें ह्मणतात. काकरोळी हा गांव बराच मोठा असून त्यांत बाजारचा भाग चांगला आहे.

एकलिंगजीचें संस्थानही मोठें आहे. वैष्णव मारवाड्यांत ज्याप्रमाणें दोन स्नेही एकमेकांस भेटले असतां 'जय गोपाल' ह्मणून परस्परांस नमस्कार करतात, त्याप्रमाणें या प्रांतांत 'जय एकलिंगजी' असें ह्मणून रामराम करितात. येथें प्रत्यहीं दोनशें रुपयांचा खर्च आहे. एकलिंगजीचें देऊळ डोंगराळ प्रदेशांत आहे. येथें प्रसिद्ध मल्हारराव होळकर हे हें देवस्थान लुटण्याकरितां गेले होते; परंतु त्यांस काय सुबुद्धि झाली कोण जाणें, तेथें लुटफाट न करितां ते गेले तसेच परत माघारीं फिरले. एकलिंगजीचे देवळांत 'गध्धाची सोगण' ह्मणून एक स्तंभ पुरला आहे.

एकलिंगजीपासून पुढें सुमारें चार कोसांवर नाथद्वारचें देवस्थान आहे. ह्या देवस्थां-

नाकडे प्रतिदिवशीं आठशें रुपयांचा खर्च होतो. देवाच्या पूजेला व नैवेद्याला लागणाऱ्या पदार्थांचे निरनिराळे स्वतंत्र कारखाने व कोठे आहेत. जेथें फुलांचे हार, तुरे, गजरे वगैरे करितात त्यांस फुलघर असें ह्मणतात. जेथें भाजीपाला निवडला जातो त्यास भाजीघर ह्मणतात. ज्या घरांत दुधाचा पुरवठा केलेला असतो त्यास दूधघर असें ह्मणतात. ज्या घरांत विरजणाचा कारखाना आहे त्यास दहिघर ह्मणतात. अशा प्रकारचे कारखाने व कोठे आहेत. ह्याशिवाय वस्त्रप्रावरणांचे, दागदागिन्यांचे, जडजवाहिराचे व भांड्याकुंड्यांचे कारखाने वेगळेच आहेत. या देवस्थानाला तीन लाख रुपयांची स्वतंत्र नेमणूक तोडून दिलेली असून शिवाय पांच लाख रुपयांची जहागीर आहे. याशिवाय प्रतापगड संस्थानांतून पंचवीस हजार रुपयांची जहागीर आहे. रतलाम संस्थानांतून दोन गांव इनाम असून, कोटा संस्थानाकडून चार गांव इनाम आहेत. त्याचप्रमाणें डोंगरपूर, जोधपूर, उदेपूर वगैरे कितीएक संस्थानांतून या देवास उत्पन्नें आहेत. तेथें पूजेची सामुग्री पाहण्यासारखी व फार मोठी असून, देवाच्या नित्य पांच वेळ पूजा होत असतात. बाळभोग, राजभोग, शृंगार, शयन इत्यादि पूजेचे प्रकार असून, त्यांच्या निरनिराळ्या वेळा नेमिल्या आहेत. दर्शनेच्छूंना देवाच्या दर्शनाकरितां ह्या वेळा साधाव्या लागतात. त्या वेळांवांचून भलते वेळीं देवदर्शन होत नाहीं. ह्मणून प्रत्येक पूजेच्या वेळीं भक्तमंडळी दर्शनाकरितां टपून बसलेली असते. अशा नियमितदर्शनास 'मर्यादी दर्शनें' असें ह्मणतात.

नाथद्वारापासून वीस कोसांवर चतुर्भुजनाथाचें संस्थान आहे. ह्याही देवाच्या पूजेअर्चेचा थाट मोठा व चांगला असतो. येथें श्रीमाळीब्राह्मणांची वस्ती पुष्कळ आहे.

मेरवाडा ह्मणून एक प्रांत आहे, त्यांत उदेपूरच्या राण्याचा अधिकार आहे. हा प्रांत अगदीं रानटी स्थितींत होता ह्मणून तो सुधारण्याकरितां इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतला आहे. प्रथम हा प्रांत ताब्यांत घेते वेळेस १० वर्षांच्या मुदतीचा करार होता. तरी अद्यापि तो प्रांत इंग्रजांकडेच आहे. उदेपूरदरबारच्या पोटांत प्रथम पहिले प्रतीचे सोळा व दुसरे प्रतीचे सोळा असे एकंदर ३२ सरदार होते. पण पुढें प्रत्येक राजानें आणखी वाढविल्यामुळें हल्लीं ती संख्या पुष्कळच ज्यास्त झाली आहे. उदेपुरास राजाचा वाडा फार मोठा असून, त्यांत फार विस्तीर्ण व सुरेख असा एक संगमरवरी हौद आहे. ह्या राजवाड्याच्या पलीकडे शंभुनिवास नांवाचा दुसरा एक राजवाडा असून तो शंभुसिंह नांवाच्या राण्यानें बांधला आहे. ह्या राण्याच्या कारकीर्दींत लक्ष्मणराव चिंतामण उज्जनीकर या नांवाच्या गृहस्थामार्फत राज्याचा कारभार चालविण्याविषयीं कर्नल ईडन यानें ठराव केला. उदेपुरच्या गादीवरील राण्यास इंग्रज सरकाराकडून पंधरा तोफांच्या सलामीचा मान आहे.

श्रीमद्दयानंद सरस्वति स्वामी अजमीर येथें समाधिस्थ झाले. त्यांनीं आपले मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें 'परोपकारिणी' नांवाची सभा प्रतिसंवत्सरीं अजमीर येथें भरत असते.

# शामलदास.

चारण यांची उत्पत्ति पृथुराजापासून झाली आहे. हे चारण रजपुतांचे गुरु आहेत. रजपूत लोक पुष्कळ दानें देतात. त्यांत गांव, जमिनी, पैसा त्यांस मिळतो. त्या चारण वंशांत कविराज शामलदास ह्यांचा जन्म सन १८३७ त झाला. हे महाराणा स्वरूपसिंह साहेब ह्यांचे दरबारांत आले. पुढें शामलदासांचे वडील कमजी वारले तेव्हां स्वरूपसिंहांचे चिरंजीव शंभुसिंह त्यांचे घरीं समाचारास आले होते. त्यांनीं शामलदास यांस उदेपुरास एक घर बांधून दिलें, व दरबारामध्यें तिसरे नंबरावर बसण्याचा हुकूम दिला. पुढें १८७७ मध्यें सज्जनसिंह साहेब यांनीं शामलदासजीचे घरीं येऊन त्यांस ताजीम व चांदीची छडी दिली. व पुढें पायांत घालण्यास सोन्याचा लंगर दि... पुढें शामलदासांना 'कविराज' असा किताब दिला. सन १८८४ त सज्जनसिंह उदेपूरचा राजा, यशवंतसिंह जोधपूरचा राजा व कृष्णगडचा शार्दूलसिंह हे तिघे उदेपुरास शामलबाग म्हणून आहे तेथें मेजवानीस आले होते. त्यांस सन १८८८ मध्यें इंग्रजसरकारांतून 'महामहोपाध्यांय' असा किताब मिळाला. हे कलकत्याचे एशियाटिक सोसायटीमध्यें मेंबर आहेत; व हल्लीं उदेपूरचे राज्यांत नेकसलागार व मुसाहेब व अदालत व इजलासखास याचे मेंबर आहेत. यांनीं पुष्कळ पुस्तकें रचिलीं आहेत. यांनीं आपला पुतण्या गोपाळदास याचा मुलगा यशकर्ण हा दत्तक घेतला आहे.

---